# जय झुंजार

( एक दुर्मिळ झुंजार-कथा )

बाबूराव अर्नाळकर





रहस्यरंजनमाला

किंमत १।। रुपया

रहस्यरंजनमाला-

# जय झुंजार !

(एक दुर्मिळ झुंजार-कथा)

(कादंबरी क्र. ५५०)

-: लेखक :-

बाबूराव अर्नाळकर

रम्यकथा प्रकाशन

११२ नारायण पेठ, कान्हेरे बिल्डिंग, पुणें ३०

किंमत १॥ रुपया

मुद्रकवा. ग. मेहेंदळे, जयभारत मुद्रणालय, ५५१ बुधवार पेठ, पुणें २.
प्रकाशक : वा. ग. मेहेंदळे, ३९२ नारायण पेठ, कान्हेरे बिल्डिंग, पुणें ३०

तृतीयावृत्ति : सप्टेंबर १९७०　　　　　किंमत १॥ रुपया

# जय झुंजार

## १ : ऐन विवाहाच्या दिवशीं !

सुधाकर खूप दारू प्याला होता आणि ती गोष्ट सर्वांच्याच लक्षांत आली होती. विवाह–विधि चालू असतांना आणि अहेर–अर्पण समारंभांतहि तो इतक्या समजूतदारपणें वागला होता कीं, त्याची तेथली उपस्थितीहि कुणाच्या लक्षांत आली नव्हती. पण नंतर त्यानें खिशांतील बाटली काढून तिचे अधूनमधून घुटके घेण्यास सुरुवात केली होती आणि त्याचा हा दुर्दैवी परिणाम झाला होता. अर्थात् सुधाकराजवळ सरकारी परवाना होता.

दारूचा निरनिराळ्या माणसांवर निरनिराळ्या प्रकारें परिणाम होतो. सुधाकर हा सभ्य, सुसंस्कृत आणि श्रीमंत तरुण होता. तें पेय पोटांत गेल्यानंतर प्रथम तो चिडखोर बनला आणि आणखीं बरेच घुटके घेतल्यानंतर त्याची वाऱ्याबरोबरहि ओरडून भांडण्याची तयारी झाली होती. आतां तो अशा अवस्थेपर्यंत पोहोंचला होता कीं तें कुणालाहि समजलें तरी त्याची त्याला मुळींच पर्वा नव्हती.

विलासिनीला तें समजलें होतें. कारण तें कुणालाहि समजण्याइतकें स्पष्ट होतें आणि तिला त्यामुळें खेद झाला होता, ती लज्जित बनली होती. नववधु–अत्यंत प्रफुल्लित, सुखी, सौंदर्यसंपन्न नववधु–निदान त्यावेळीं तरी साऱ्या जिल्ह्यांत तिच्याइतकी आनंदी तरुणी दुसरी नव्हती. त्यामुळें तिनें जेव्हां सुधाकराचे तारवटलेले व रागीट लाल डोळे पाहिले, बरळणाऱ्या त्याच्या तक्रारी ऐकल्या तेव्हां ती चिडलीहि आणि घाबरलीहि.

'विलास, हें अजिबात चुकीचें आहे' ती वरच्या मजल्यावर जाण्याच्या विचारांत असतांना तिचा हात जोरानें पकडून तो अडखळत म्हणाला, 'माझ्याबरोबरच तूं लग्न करायला हवें होतें. त्या हवेंत उडणाऱ्या म्हसोबा-बरोबर नव्हे. तूं त्याच्याहिपेक्षां कित्येक वर्षें आधीं मला ओळखत होतीस.'

'सुधाकर, कांहींतरी बोलूं नकोस !' ती म्हणाली.

'हें कांहींतरीच नाहीं, सत्य आहे.' तो आवाज उंचावून म्हणाला.

'तूं खूप दारू प्याला आहेस आणि मी तुला तेथें तमाशा करूं देणार नाहीं.' ती रागानें म्हणाली, 'जर तुला असें वाटत होतें तर तूं यायलाच नको होतें ...'

'माझी येण्याची इच्छाच नव्हती.' तो कपाळावर आंठ्या चढवून म्हणाला, 'तरी शेवटीं आलों. पण मी तुला सांगतों, जें झालें तें योग्य झालें नाहीं मीं कित्येक वर्षे तुझ्यावर प्रेम केलें ...'

ती त्याच्यापासून दूर झाली व घाईघाईनें प्रशस्त जिन्याच्या पायऱ्या चढून वरच्या मजल्यावरील दिवाणखान्यांत गेली. तिचा सुंदर, गौरवर्ण चेहरा रागानें जास्वंदीचें फूल बनला होता. सुधाकरानें स्वतःला अशा अवस्थेंत न्यावें ही फार वाईट गोष्ट होती. तो शुद्धीवर असला कीं, त्याच्यासारखा सभ्य माणूस दुनियेंत नव्हता.

'या सगळ्या अशाच !' सुधाकरानें हवेजवळ तक्रार केली—'बायका ? त्यांच्यावर दहा मिनिटेंहि विश्वास ठेवतां येणार नाहीं !'

'हें विधान फार कठोर आहे !' कुणींतरी हलक्या आवाजांत म्हटलें.

सुधाकर धडपडत मागें वळला आणि त्यानें आपली अस्थिर नजर एका सडपातळ आणि अभ्यासू चर्येच्या माणसावर रोंखली. तो माणूस अचानक आकाशांतूनच खालीं कोसळला असें त्याला वाटत होतें.

'कोण—रामलाल ? मीं तुला पाहिलेंच नव्हतें. पण माझें विधान कठोर आहे असें तूं कां म्हणालास ?' सुधाकरानें रागानेंच विचारलें, 'तें सत्य आहे. बायका या हरळी आहेत. मला तूं एक कुऱ्हाड आणून दे. मी त्यांच्यांतील पांच—सहा जणींना मोठ्या आनंदानें ठार करीन ! अर्थात तुझ्या बहिणीला नाहीं...' तो थांबला आणि त्यानें थोडा विचार केला—'कां नाहीं तें मात्र मला समजत नाहीं. तिनें मला फार वाईट प्रकारें वागविलें...'

'अरे देवा ! तूं तर खूप प्याला आहेस.' रामलाल म्हणाला.

'ठीक, मी खूप दारू प्यालों आहें !' सुधाकर ओरडून म्हणाला, 'तं माझें काय करणार आहेस ? बोल, काय करणार आहेस ? जर तुला माझ्याबरोबर भांडायचेंच असेल तर माझीहि...'

'सुधाकर, तूं असें कांहीं बोलूं नकोस.' विलासिनीचा भाऊ मध्येंच म्हणाला. त्यानें आपल्या जाड फ्रेमच्या चष्म्यांतून घाईघाईनें आजूबाजूला पाहिलें आणि त्या दोघांशिवाय तेथें कुणी नाहीं हें पाहून त्याला अतिशय समाधान वाटलें. 'मला वाटतें सुधाकर, तूं आतां माझ्याबरोबर चल. बाहेर सुंदर सूर्यप्रकाश आहे. आणि मोकळ्या हवेंत तुला खात्रीनें बरें वाटेल.'

'मरो तो सूर्यप्रकाश आणि खड्डयांत गेली ती मोकळी हवा !' वर एक शिवी हांसडून सुधाकर म्हणाला, 'मला आणखीं दारू हवी—माझी बाटली

संपली. त्या विलासनें मला फसविलें. जर मला तो पाजी शरद भेटला तर मी त्याचे सर्व दांतच पाडीन !'

त्यानें रामलालचा हात झिडकारला आणि तो झोकांड्या देत भोजनाच्या दिवाणखान्यांत गेला. रामलाल हा नेहमींचाच नेभळा होता. सध्यांच्या परिस्थितीला तोंड देण्यास तो अगदींच असमर्थ होता. पुन्हां आपली आणि सुधाकराची गांठ पडूं नये या एकच विचारानें तेथून घाईघाईनें दूर व्हावें एवढेंच त्याला सुचत होतें.

एरव्हीं बाहेर जाण्याची त्याची इच्छा नव्हती. बाहेर खूपच माणसें होतीं. रंगीबेरंगी पोशाख केलेले आणि भपकेबाज सुटा–बुटांत असलेले पुरुष, दुड-दुड धांवणारी लहान मुलें ... तें दृश्य फार आनंदी होतें. सारखीं हास्याचीं कारंजीं उडत होतीं.

रामलाल ओटीवर घुटमळला. त्याचा अभ्यासू चेहरा बावरलेला दिसत होता. या रंगीबेरंगी आनंदानें तो अस्वस्थ झाला होता कधीं एकदां ती गडबड संपून घरांत शांतता पसरते आणि त्याला पुस्तकांत–अभ्यासांत मन गुंतवितां येतें असें त्याला झालें होतें.

आबासाहेब गरुडांच्या त्या वाड्यांत असलें दृश्य कित्येक पिढ्यांत पहावयास मिळालें नसणार. बाहेरची बाग आणि हिरवळीचीं उद्यानें आतां माणसांनीं खच्चून भरलीं होतीं. आणि विशेष गोष्ट म्हणजे अगदीं दारासमोरच एक रंगीबेरंगी मांडव घालण्यांत आला होता. त्या मांडवांत शेंकडों विजेचे दिवे टांगले होते आणि रंगीत फुलांच्या आणि कागदांच्या पताकांनीं तो शृंगारला होता. रामलालच्या दृष्टीनं तें दृश्य अत्यंत भडक आणि ओंगळ होतें. त्यामुळें तेथली नेहमींची शांतता व साधेपणा नष्ट होत होता आणि शांतता व साधेपणा हा रामलालला व त्याच्या वडिलांना प्रिय होता.

त्याचे वडील सडपातळ होते आणि वयाची साठी उलटली असतांनाहि त्यांच्या शरीराची काठी ताठ होती. ते त्या आनंदी जमावांत आपल्या व्यक्तिमत्वामुळें उठून दिसत होते. ते नामांकित वकील होते. आतां चांगले दिसत लागल्यामुळें सेवानिवृत्त झाले होते. ते एकांतवासाचे भोक्ते होते. ते आतां सार्वजनिक जीवनांतून अलिप्त झाले होते आणि त्यामुळेंच ते आपल्या मुलीच्या विवाहाचा आनंदोत्सव साजरा करण्यासाठीं आपल्या नेहमींच्या खुराड्यांतून बाहेर पडले हें इतरांच्या दृष्टीनें एक आनंददायक आश्चर्य होतें.

त्यामुळेंच नेहमीं अगदीं शांत व त्यामुळेंच रुक्ष भासणाऱ्या गरुडांच्या वाड्याचें स्वरूप गेले कांहीं दिवस अजिबात पालटलेलें दिसत होतें. ती जागा गजबजलेली, विविध रंगांनीं आणि हास्यध्वनीनें भरलेली होती. आणि तो लग्नसमारंभ आजुबाजुच्या रहिवाशांच्या लक्षांत कित्येक वर्षे रहावा अशा थाटामाटाचा होता.

आबासाहेब गरुड हे आपला रुबाब सांभाळून पाहुण्यांतून फिरत होते व त्यामुळें पाहुण्यांनाच लाजल्यासारखें वाटत होतें. त्यांच्या काळ्या चष्म्यामुळें आबासाहेब नक्की कुठें पहात आहेत हें समजणें अशक्य होतें. त्यांचा निर्विकार व ठसठशीत चेहरा पाहून जणूं काय त्यांनी तोंडावर मुखवटा चढवला आहे असें पहाणाऱ्यास वाटत होतें, पण ते आपला नेहमींचा शिरस्ता सोडून आनंदांत सहभागी होण्याचा प्रयत्न करीत होते हें त्यांच्या सुंदर कन्येलाहि कबूल करावें लागलें असतें.

'आतां एका मिनिटापूर्वीं मीं त्यांना खरोखरच हंसतांना पाहिलें.' एक पाहुणा दुसऱ्याला हळूच म्हणाला, 'जेव्हां ते कोर्टाचें काम करीत असत तेव्हां, "कधींहि न हंसणारा माणूस" असें त्यांचें वर्णन करण्यांत येत असे.'

'वार्ताहरांनीं केलेलें तें वर्णन आहे.' दुसरा खांदे उडवीत म्हणाला, 'पण त्यांचा दरारा जबरदस्त होता आणि सरकारी वकील या नात्यानें तर ते भयंकरच होते. असें म्हणतात कीं, त्यांच्या ऐन उमेदीच्या काळांत त्यांची वार्षिक प्राप्ति तीन लक्ष रुपयांच्या घरांत होती. आतांहि त्यांच्याजवळ भरपूर पैसा असणार.'

'त्या पैशांचा त्यांना ' उपयोग काय ?' पहिला पाहुणा म्हणाला, 'ते आणि त्यांचा मुलगा वर्षानुवर्षे या जगाबाहेरच्या जागेंत रहात असतात. हें मुलीच्या दृष्टीनें अतिशय वाईट. तीं फारच सुंदर आहे ... मीं इतकी तेजस्वी वधू कधीं पाहिली नव्हती. पण ती गेलीं दोन वर्षे येथें रहात नव्हती. मुंबईत तिची स्वतंत्र जागा होती.'

'आतां शरद तिला चांगलें घर देईल.' दुसरा म्हणाला, 'तो माणूस फारच चांगला आहे. इतका अनुरूप वर मुलीला मिळाला याचा आबासाहेबांना आनंदच झाला पाहिजे.'

'तसें म्हटलें तर शरदहि सुदैवी आहे असें म्हटलें पाहिजे. विलासिनीइतक्या सुंदर मुली फार दिसणार नाहींत आणि माझी खात्री आहे कीं तिच्याजवळहि स्वतःचे बरेच पैसे असणार.'

ज्याच्याबद्दल चर्चा चालली होती तो नवरा मुलगाहि पाहुणे मंडळींत हंसतमुखानें आणि प्रेमानें फिरत होता त्यानें पूर्वीं वैमानिक म्हणून खूप कीर्ति मिळविली होती. व आतां त्याचें वय बत्तीस वर्षांचें होतें. पण वयाच्या मानानें तो बराच तरुण आणि टवटवीत दिसत होता. तो एका खाजगी व्यापारी विमान कंपनींत विमानांची चांचणी करणारा मुख्य वैमानिक म्हणून काम करीत असे.

मोठ्या युक्तीनें पाहुण्यांपासून दूर होऊन शरदनें शांत घरांत प्रवेश केला. तो आपल्या पत्नीला शोधीत होता. कारण त्यांना थोड्याच वेळांत

मधुचंद्रासाठीं तेथून प्रयाण करावयाचें होतें. तो सुदैवी होता, कारण ती त्याच वेळीं जिना उतरून खालीं येत होती. पण त्याची विलक्षण वागणूक पाहून तिला आश्चर्य वाटलें होतें, ती बुचकळ्यांत पडली होती.

तो आतां पूर्वीप्रमाणें मनमोकळा, निष्काळजी दिसत नव्हता. तो स्पष्टपणें उत्तेजित झाला होता. त्याच्या डोळ्यांत अनैसर्गिक छटा दिसत होत्या. त्याच्या भावना अशा कधींच उफाळलेल्या न दिसल्यामुळेंच ती बुचकळ्यांत पडली होती. आणि त्या महत्त्वपूर्ण दिवसामुळेंच त्याची अशी अवस्था झाली आहे अशी समजूत झाल्यामुळेंच तीहि बावरली होती. त्याच्यांतील त्या बदलाचें कारण आपणआहोंत असा तिला अभिमानहि वाटला.

'तूं कपडे बदलले आहेस हें चांगलें झालें.' तो घाईघाईनें म्हणाला, 'एक मिनिटभर त्या घोळक्यांतून दूर होतां आलें याबद्दल मी ईश्वराचे आभार मानतों. तुझी सर्व तयारी आहे ना ? आपण आणखीं अर्ध्या तासांतच निघालें पाहिजे...पण काय झालें ? तूं कसली चिंता करीत आहेस ?'

'मी कसलीहि चिंता करीत नाहीं.' ती हंसून म्हणाली, 'मी विचार करीत होतें कीं तुमची आणि सुधाकराची गांठ पडली होती काय ? थोड्या वेळापूर्वीं तो येथें होता आणि त्यानें प्रमाणाबाहेर दारू घेतली असावी अशी मला भीति वाटते.'

'त्यानें एकट्यानेंच घेतलेली नाहीं.' शरद हंसून म्हणाला, 'तुझ्या वडिलांनींहि बरीच घेतली आहे. कांहीं खास पाहुण्यांसाठीं तीहि व्यवस्था होती. तेव्हां तूं सुधाकराला दोष देऊं शकणार नाहींस, पण सुधाकराचा विषय कशाला ? मला तुझ्याकडे पहात येथेंच उभें रहावयाचें आहे.'

'पण तुम्हांला तसें करतां येणार नाहीं. कुणीहि येथें येण्याचा संभव आहे. मला त्या सुधाकराचीहि चिंता वाटते. दुसरें कुणीहि असतें तरी चाललें असतें. पण सुधाकर दारू प्याला कीं भलताच भांडखोर बनतो. तो येथें गोंधळ घालील अशी मला भीति वाटते. तो इतरांबरोबर बाहेर आहे काय ?'

'मीं त्याला बाहेर पाहिलें नाहीं.' विलास म्हणाला, 'पण मला त्याच्याबद्दल वाईटच वाटतें. तुझ्यावर त्याचें प्रेम आहे अशी त्याची कल्पना आहे आणि...'

'नुसती कल्पना नाहीं.' ती मध्येंच म्हणाली, 'तीच तर पंचाईत आहे. त्यानें आतांपर्यंत निदान बारा वेळां तरी माझ्याजवळ लग्नाचा विषय काढला होता आणि त्यानें अगदीं आजपर्यंत ती अशा सोडली होती असें मला वाटत नाहीं. आतां त्याला समजेल कीं... कुणीतरी येत आहे. आपण असे येथें उभें रहाणें वेडेपणाचें दिसेल.'

'कोण पर्वा करतो ?' तो तिचा हात धरून तिला जवळ ओढीत म्हणाला, 'आपण आज वेडेपणाच केला पाहिजे. कुणीहि आपणांला दोष देणार नाहीं.

पण हें बघ, आतां फक्त अर्धा तास उरला. तुझी प्रवासाची तयारी आहे ना ?'

त्याच वेळीं तिघे पाहुणे पुढल्या दारानें हंसत आंत आल्यामुळें तिची तारांबळ उडाली. ती त्यांच्याकडे न पहातां त्याच्या बाहुपाशांतून आपली सुटका करून धांवतच भोजनाच्या दिवाणखाण्यांत गेली. असें करण्यांत तेथून निसटणें एवढाच तिचा हेतु होता व दुसरें दार जवळ नव्हतें.

'नमस्ते सुंदरी ... अनेक कृतानेक नमस्कार.' तिला घोगरा आवाज ऐकूं आला, 'तूं थोडी घेशील काय ?'

'अरे देवा !' ती दचकून म्हणाली.

सुधाकर आधारासाठीं एका हातानें टेबल पकडून उभा होता आणि त्याच्या दुसऱ्या हातांत मद्यानें भरलेला प्याला होता !

'सुधाकर ! तूं पुन्हां दारू पीत आहेस ?'

'पुन्हां ? या तुझ्या बोलण्याचा अर्थ काय ?' तो अडखळत म्हणाला, 'येथें आल्यापासून मी सारखा दारू पीत आहें आणि येथून मला लाथ मारून हांकलण्यांत येईपर्यंत मी दारू पीतच रहाणार ! तो पाजी–हरामखोर शरद कुठें आहे ? मला तो दिसला कीं मी त्याचें डोकेंच फोडणार आहें !'

विलासिनी शूर आणि चपळ होती. तिनें आपले दांत आंवळले आणि ती पुढें झाली. तिनें सुधाकराच्या हातांतील प्याला खेंचला आणि आंतलें पेय खिडकीबाहेर झुगारलें. ती आतां खरोखरच रागावली होती.

'अरे अरे, हें तूं काय–काय करतेस ?'

'सुधाकर, तूं खूप झिंगला आहेस, आणि मला तुझी लाज वाटते.' ती रागानें म्हणाली, 'माझ्या लग्नाच्या दिवशीं तूं असा धिंगाणा घालायला हवा होता काय ? लोक आतां येथें येतील. कोणत्याहि क्षणीं कुणी येईल.'

तिच्या त्या अनपेक्षित दमदाटीमुळें क्षणभर त्याच्या डोळ्यांवरील धुंदी उतरून त्याला धक्का बसला. 'ठीक आहे, विलास.' तो कसेंबसें म्हणाला, 'असें तूं बोलण्याची गरज नाहीं ...'

'तूं आतां कुणी तुला पहाणार नाहीं अशा एकांत ठिकाणीं बसलें पाहिजे.' ती जोरांत म्हणाली, 'आणि तेथेंच तूं कांहीं वेळ राहिलें पाहिजे. होय, तीच जागा ! आज बाबासुद्धां त्या जागेचा उपयोग करणार नाहींत.'

तिनें त्याचा हात धरला आणि त्याला खेंचीतच पलीकडच्या दारानें बाहेर नेलें. आतां त्या भोजनाच्या दिवाणखान्यांत पाहुणे प्रवेश करीत होते. फक्त एक–दोघांनींच तिला पाहिलें पण ती आतां कुणाचीच पर्वा करण्याच्या मन:स्थितींत नव्हती. तिनें त्याचा हात सोडला नाहीं. त्याला फरफरा खेंचीत एका कोंपऱ्यांतील मजबूत दाराकडे नेलें. एका क्षणांत ते तिच्या वडिलांच्या बैठकीच्या खोलींत होते. ती एकच अशी जागा होती कीं, जेथें

कुणीहि पाहुणा येणार नव्हता. ती आबासाहेबांची अतिशय खाजगी आणि पवित्र मानलेली खोली होती.

तिनें त्याला एका मोठ्या आरामखुर्चीवर जोरानें ढकललें आणि ती धमकीच्या स्वरांत म्हणाली, 'ऐक ! तूं येथें राहिलें पाहिजे आणि शुद्धीवर आल्याशिवाय बाहेर पडतां कामा नये. या खुर्चींतून उठणारहि नाहींस अशी शपथ घे !'

'अरे देवा !' तो तिच्याकडे टक लावून पहात म्हणाला.

'आधीं शपथ घे !' ती जोरांत म्हणाली.

'अरे देवा !' तो पुन्हां म्हणाला, 'तुला मीं अशी कधीं पाहिली नव्हती, तूं तर हुकूमशहा—दुसरा आयूबखान बनली आहेस. कदाचित् एका अर्थी तें ठीक आहे. त्या पाजी—हरामखोर शरदनें माझ्याऐवजीं तुला पटकाविलें...'

'त्यांना पाजी—हरामखोर शरद म्हणूं नकोस !' ती संतापानें मध्येंच म्हणाली 'तूं अद्याप शपथ घेतली नाहींस.'

'कसली शपथ ?' त्यानें बुचकळ्यांत पडून विचारलें.

'सुधाकर तूं या खोलींतून बाहेर पडतां कामा नये. जेव्हां आम्ही–'

'ही शपथ ? ठीक आहे तूं सांगशील तें करतों. पण हें बघ, मला आतां झोंप येत आहे' तो म्हणाला.

आणि त्यानें डोळे मिटले. तिनें क्षणभर त्याच्याकडे अनिश्चितपणें पाहिलें पण ती आणखी कांहींच करूं शकणार नव्हती. ती बाहेर गेली आणि तिनें कुलुपांतील किल्ली फिरविली.

'अरेच्चा !' सुधाकर धडपडत उभा रहात म्हणाला.

त्यानें दाराचा खट्ट असा आवाज ऐकला आणि त्या आवाजाचा अर्थ ओळखण्याइतका तो शुद्धीवर आला. तो दाराजवळ गेला आणि तें हलवून बाहेरून बंद करण्यांत आलें हें पाहिलें. नंतर तो झोकांड्या देत मोठ्या आरशाकडे गेला व आपलें प्रतिबिंब पाहूं लागला.

'अगदीं हिटलरचा अवतार !' तो स्वतःशींच मोठ्यानें म्हणाला, 'मीं तिला अशी कधींच पाहिली नव्हती. पाजी कुठली !'

पण आतां त्याला खूपच बरें वाटत होतें. तो झोकांड्या देत खोलीवरून नजर फिरवूं लागला आणि त्याला एका फडताळांत आबासाहेबांची आवडत्या पोर्ट वाइनची एक बाटली आणि ग्लास मिळाला...

अगदीं याच क्षणीं बाहेरच्या सूर्यप्रकाशांत स्नान करणारा सुंदर शरद आपल्या सासऱ्याबरोबर बोलत होता. 'साहेब, मी आणि विलास येथून आणखीं अर्ध्या तासांत निघणार, पण आमच्या प्रयाणापूर्वीं मला तुमच्याशीं कांहीं खाजगी बोलायचें आहे.' तो हलक्या आवाजांत म्हणाला, 'असें कांहीं आहे कीं, जें तुम्हांला समजलेंच पाहिजे...'

मूर्ख शरद ! अरे कांहीं सांगूं नकोस...अजून माघार घेण्यास वेळ आहे. विलासचें अंतर्मन बजावीत होतें.

'अगदीं जरूर !' आबासाहेब म्हणाले. त्यांच्या आजच्या औदार्यपूर्ण वागणुकीनें सर्वच चकित झाले होते. 'आपण ताबडतोब आंत जाऊं येथें फारच गर्दी आहे.'

शरद पायापासून डोक्यापर्यंत थरथरत होता. त्या सुप्रसिद्ध वकिलांनीं आपला काळा चष्मा त्याच्याकडे वळविला व ते आपणांला जणूं सूक्ष्मदर्शक कांचेनें तपाशीत आहेत असें त्याला वाटत होतें. पण वास्तविक पहातां आबासाहेबांची दृष्टि गेले वर्षभर सारखी अधिक कमजोर बनत होती आणि त्यांना आपल्या जांवयाची अंधुक आकृति तेवढीच दिसत होती.

पण आबासाहेब गरूड तसें कुणालाच दर्शवीत नव्हते. ते आपणांला मदत व्हावी म्हणून काठीसुद्धां वापरीत नव्हते. त्यांना घराच्या आवाराची अगदीं अचूक माहिती असल्यामुळें काळा चष्मा वापरून ते मुळींच न अड-खळतां आणि न धडपडतां अद्याप कुठेंहि फिरूं शकत होते. इतर अनेक अर्धवट अंधळ्यांप्रमाणें आपणांत तें वैगुण्य आहे असें कबूल करण्याची त्यांची तयारी नव्हती.

त्यांच्याबरोबर चालतांना अनेकदां शरदच्या मनांत आलें कीं विलासनें आपल्या वडिलांच्या कमी होणाऱ्या दृष्टीबद्दल सांगितलेल्या गोष्टी अति-रंजित असाव्यात. ते अगदीं आत्मविश्वासानें आपलें प्रत्येक पाऊल उच-लीत होते.

'शरद, तूं मला बुचकळ्यांत पाडलें आहेस.' ते म्हणाले, 'कांहीं तरी मला समजलेंच पाहिजे, तर मग तूं तें मला या आधींच सांगायला नको होतें काय ?'

शरद घाबरला. अरे देवा ! त्यांचें म्हणणें बरोबर होतें ! पण आतांसुद्धां तो माघार घेऊं शकणार होता. मधुचंद्राच्या खर्चाविषयीं किंवा इतर तस-ल्याच क्षुल्लक गोष्टींबद्दल त्याला बोलतां आलें असतें.

त्याची चर्या इतकी चमत्कारिक बनली होती कीं ते दोघे जात असतांना अनेकांनीं त्यांच्याकडे कुतूहलानें पाहिलें होतें. पण त्याला मात्र कुणीच दिसत नव्हतें. आपण दुनियेंतील महागाढव आहोंत असें तो स्वतःला सांगत होता, पण अद्याप तो स्वतःला ब्रेक लावूं शकणार होता.

आबासाहेबांनीं आपल्या बैठकीच्या खोलीचें दार बाहेरून बंद करण्यांत आलें याबद्दल आश्चर्य प्रकट करीत तें किल्ली फिरवून उघडलें आणि जांवयासह आंत प्रवेश केला...

पण ती खोली रिकामी होती. निदान ती रिकामी दिसत होती. एका

हातांत पोर्ट वाइनची बाटली व दुसऱ्या हातांत अर्धवट भरलेले ग्लास असलेला सुधाकर एका मोठ्या आणि जाड पडद्याआड झाला होता !

## २ : मधुचंद्राला ग्रहण !

'मरो ते !' सुधाकर स्वत:शींच म्हणाला.

जरी तो मद्याच्या धुंदींत असला तरी दाराबाहेर झालेला आबासाहेबांच्या बोलण्याचा आवाज त्यानें ऐकला होता आणि आपण त्यांची पोर्ट वाइन् फस्त करीत आहोंत हें त्यांनीं पाहिलें तर ते आपणांसंबंधीं भलताच गैरसमज करून घेतील इतकें ओळखण्याइतका तो शुद्धीवर होता.

यजमान कितीहि प्रेमळ असले तरी एक पाहुणा आपल्या खाजगी खोलींत शिरून आपल्या खाद्यपेयांवर तुटून पडला आहे असें दिसलें कीं, त्याच्याकडे कावीळ झालेल्या नजरेनेंच पहाणार होते आणि कोणत्याहि परिस्थितींत आबासाहेब गरुडांना प्रेमळ म्हणण्याची कुणाचीहि छाती नव्हती.

आणि ती बाटली आणि ग्लास फडताळांत ठेवण्याइतकी त्याला सवड नव्हती. किल्ली फिरण्याचा आवाज झाला तेव्हां तो पडद्याजवळ होता. त्यामुळें दुसरा कांहीं इलाजच नसल्यामुळें तो पडद्याआड झाला होता. एकदां तेथें लपल्यानंतर पुन्हां तेथून बाहेर पडणें शक्य नव्हतें. म्हणूनच 'मरो ते !' असें सुधाकर मनांत म्हणाला होता.

आबासाहेब आणि तो दुसरा माणूस अशा गडबडीच्या वेळीं कांहीं मिनिटांपेक्षां जास्त वेळ बैठकीच्या खोलींत थांबणार नव्हते. तेथून ते कांहीं तरी नेण्यासाठीं आले असणार...

'बोल शरद, आतां इथें दुसरें कुणी नाहीं.' आबासाहेबांचें बोलणें व खुर्चीचें करकरणें ऐकूं आलें—'खालीं बैस. तूं मला काय सांगणार आहेस ?'

सुधाकर मोठ्यानें दचकला. दुसरा माणूस पाजी—हरामखोर शरद होता ! सुधाकरला तो एकटाच कुठें तरी मिळायला हवा होता. पण आतां तो त्याच्यापासून कांहीं फुटांवरच होता. पण तो त्याचें कांहींच करूं शकत नव्हता.

त्यानंतर पसरलेल्या शांततेमुळें तो बुचकळ्यांत पडला होता. शरद बसला नव्हता. तो पायापासून मस्तकापर्यंत थरथरत टेबलाजवळ उभा होता. आतां ती वेळ आल्यानंतर त्याच्या मनांत अनेक शंका उद्‌भवल्या होत्या आणि त्याचा निश्चय जवळजवळ डळमळलाच होता.

'बोल शरद, काय प्रकार आहे ?' आबासाहेब जरा चिडूनच म्हणाले, 'तुला काय झालें ? तूं मला उत्तर कां देत नाहींस ?'

'मूर्खा ! तोंड उघडूं नकोस ! अजून वेळ आहे !' शरदचें मन बजावीत होतें.

'होय साहेब.' घसा खाकरून साफ करीत शरद घोगऱ्या आवाजांत म्हणाला, 'विलास आणि मी आणखीं अर्ध्या तासांतच येथून जाणार आहोंत आणि तुम्हांला तें समजलें पाहिजे असें मला वाटतें.'

'पुढें बोल.' तो थांबतांच आबासाहेब म्हणाले, 'मला काय समजलें पाहिजे ?'

महामूर्खा ! आतां तरी थांब ! तोंड उघडलेंस कीं घात होईल ! त्याच्या अंतर्मनानें पुन्हां निर्वाणीचा इषारा दिला.

पण शरदनें तोंड उघडलेंच. 'साहेब, मी आणखीं कांहीं बोलण्यापूर्वीं तुम्हीं माझ्याकडे नीट पहावें अशी माझी इच्छा आहे.' तो म्हणाला.

'तुझ्याकडे पाहूं ? म्हणजे हा काय चावटपणा...'

'तुम्ही माझ्याकडे लक्षपूर्वक पहा.' त्यांच्यापासून अवघ्या एका फुटावर आपलें तोंड सरकवीत शरद म्हणाला, 'तुमचा तो चष्मा काढा आणि चेहरा तपासून पहा तुमची दृष्टि अधु आहे हें मला माहीत आहे. पण तुम्हांला एका फुटावरून बरेंच चांगलें दिसतें असें विलास म्हणाली होती. मी आतां-पर्यंत तुमच्या इतक्या जवळ कधींच आलों नव्हतों. आबासाहेब, आतां नीट पहा !'

आबासाहेब दचकले. त्यांनीं अर्धवट यंत्राप्रमाणेंच चष्मा दूर केला आणि जवळ आलेल्या त्याच्या चेहऱ्याकडे त्यांनीं शक्य त्या बारकाईनें पाहिलें.

'अरे देवा ! शरद, तुला झालें आहे तरी काय ? या असल्या चमत्का-रिक वागणुकीचा अर्थ—' ते एकाएकीं बोलतांना थांबले. त्यांनीं शरदचा हात पकडून त्याला आणखीं जवळ ओढलें, 'होय ! मला तुझा चेहरा ओळखीचा—'

ते थांबले आणि त्यांच्या तोंडांतून चमत्कारिक आवाज निघाला. त्या आवाजामुळे घडाभर थंड पाणी मस्तकावर ओतावें त्याप्रमाणें सुधाकराला होऊन तो शुद्धीवर आला.

वरच्या मजल्यावर विलासिनी प्रवासाच्या तयारीवरून शेवटचा हात फिरवीत होती. तिच्या बॅगा भरण्यांत आल्या होत्या. तिची खास मोल-करीण मंजुळा हिची धांवपळ उडाली होती.

'मंजू, तूं किती मूर्ख आहेस.' विलासिनी हंसून म्हणाली, 'माझ्यापेक्षां तुझीच जास्त गडबड उडालेली दिसते !'

'ताईसाहेब, त्याला इलाज नाहीं.' मंजुळा म्हणाली, 'तुम्ही आणि शरदराव विमानानें काश्मीरला जाणार आणि आज रात्रींच श्रीनगरांत जाणार हें मला शक्यच वाटत नाहीं ! आजकालच्या जगाला झालें आहे तरी काय ?'

'काश्मीरला जाण्याची माझी फार इच्छा होती.' विलासिनी म्हणाली,

'आणि आम्ही खास विमानानें पठाणकोटला जाणार व तेथें दुसऱ्या विमानांत बसणार. आम्ही श्रीनगरांत पोहोंचूं तेव्हां संध्याकाळहि संपली नसणार. आम्ही आतां निघालोंच. तूं आज संध्याकाळींच मुंबईच्या आपल्या जागेंत जा आणि मी परत येईपर्यंत तेथली नीट व्यवस्था पहा. पण तुला एकटीलाच तेथें रहाणें जमेल ना ?'

'न जमायला काय झालें ?' मंजुळेनें हंसून विचारलें, 'अनेकदां तुम्ही मला एकटीलाच ठेवून बाहेर जात नव्हतां काय ? पण ताईसाहेब, तुम्ही आतां परत आल्यानंतर ती जागा कायम ठेवणार आहांत काय ?'

'अर्थातच नाहीं. पण मंजू, अशी विचारांत पडूं नकोस. तूंहि आमच्या गोष्टीबरोबर आमच्या नव्या घरांत असशील.' विलासिनी म्हणाली, 'पण तसल्या बोलण्याची ही वेळ नाहीं. मला आतां घाई केली पाहिजे. त्यांची तयारी झाली असणार आणि मी खालीं उतरलें नाहीं म्हणून ते कावरेबावरे बनले असणार.'

तिनें आरशासमोर उभें राहून स्वत:वरून शेवटची नजर फिरविली. तिला नाराज होण्याचें कांहींच कारण नव्हतें. ती अतिशय सुखी, समाधानी आणि सुंदर दिसत होती. तिचें वय फक्त एकवीस वर्षांचेंच होतें.

ती घाईघाईनें जिना उतरून खालीं गेली तेव्हां शरद दिवाणखान्यांत उभा असणार अशी तिची खात्री होती. पण तो तेथें नव्हता. पांच मिनिटांपूर्वी तो तिच्या वडिलांबरोबर त्यांच्या बैठकीच्या खोलीकडे गेला असें तिला नोकरांनीं सांगितलें.

ती किंचित चिडली पुरुष हे असेच ! सुरुवातच उशिरां झाली तर पुढें त्यांना धांवपळ करावी लागणार होती. ती बैठकीच्या खोलीजवळ जात असतांनाच तिला मोठ्यानें ओरडण्याचा आवाज ऐकूं आला. ती पुढें धांवली आणि तिला आपले वडील जमिनीवर सपशेल पडले आहेत आणि शरद त्यांच्याजवळ वांकला आहे असें दिसलें. शरदची चर्या दचकलेली व उत्तेजित दिसत होती.

'शरद, काय घडलें ?' तिनें विचारलें.

'मला समजतच नाहीं.' तो धांपा टाकीत म्हणाला, 'मी त्यांच्याशीं बोलत होतों आणि एकाएकीं ते चमत्कारिक आवाजांत ओरडले आणि खालीं पडले. विलास, तूं येथें आलीस ही ईश्वराची कृपाच म्हणावयाची. मला वाटतें, त्यांना झटका आला असावा किंवा तशाच प्रकारचें कांहीं घडलें असावें.'

'नको. निदान आज तरी तसें कांहीं घडावयास नको !' ती घाबरून म्हणाली, 'त्वरा करा ! डॉक्टर मानकरांना टेलिफोन करा पण किती मी मूर्ख ! डॉक्टर तर येथेंच आहेत. तेहि एक पाहुणे आहेत. शरद, त्यांना

घेऊन या.'

ती गुडघे टेकून आपल्या वडिलांशेजारीं बसली. ते इतक्या जोरानें श्वासो-च्छ्वास करीत होते कीं जणूं काय ते आपल्या प्राणासाठीं धडपडत होते त्यांचे डोळे उघडे होते. ते निश्चल होते. जणू काय ते विलासिनीला पहात होते पण त्यांना ती दिसत नव्हती.

तिनें त्यांचे दोन्ही खांदे पकडून त्यांना उठविण्याचा प्रयत्न केला. तिला हळुवार बोलणें आणि जलद पावलांचा आवाज ऐकूं येत होता. शुभ्र केसांचे, बुटकेच डॉक्टर मानकर शरदबरोबर तेथें आले. आणखीहि मंडळी आली होती त्यांच्यांतील कांहीं आंत आले, बाकीचे बाहेर उभे राहून पाहूं लागले. सर्वांचें लक्ष खालीं पडलेल्या आबासाहेबांकडे होतें. त्यामुळें सुधाकर पडद्या-आडून बाहेर आला हें कुणींच पाहिलें नाहीं. तो तेथें असणें हें अगदीं स्वाभाविक होतें.

फिकट चर्येचा चिंताक्रान्त रामलाल आंत आला.

'बाबांची प्रकृति बिघडली असें मीं ऐकलें.' तो म्हणाला, 'मी कांहीं मदत करूं शकेन काय ?'

त्यानें कुणाच्या उत्तराची वाट पाहिली नाहीं, पण घाईघाईनें पुढें होऊन आबासाहेबांना उचलून कोचावर ठेवण्यास मदत केली. त्या हालचालीचा परिणाम मात्र समाधानकारक झाला. कारण आतां आबासाहेब अधिक सहजतेनें श्वासोच्छ्वास करूं लागले आणि त्यांच्या डोळ्यांतील निस्तेजपणाहि कमी झालेला दिसला.

'विलास, मला वाईट वाटतें,' ते जवळ असलेल्या विलासिनीचा हात घट्ट पकडून अगदीं हलक्या आवाजांत म्हणाले, 'माझा वेडेपणाच झाला. काय घडलें तेंच समजलें नाहीं. एकाएकीं डोक्यांत मोठा स्फोट व्हावा तसे झालें. पण पोरी, मला सोडूं नकोस. इतक्यांतच कुठें जाऊं नकोस. जाणार नाहीं असें मला वचन दे.'

'अर्थातच जाणार नाहीं.' ती डॉक्टरांकडे आर्जवी नेत्रकटाक्ष फेंकीत म्हणाली.

'बाबा, तुम्ही अगदीं शांत रहा.' रामलाल म्हणाला, 'कुणीहि तुम्हांला सोडून जाणार नाहीं. तुम्हांला लवकरच बरें वाटेल.'

आबासाहेबांना बोलतांना पहाणें दुःखदायक होतें. त्यांचा आपल्या जबड्या-वरील ताबा नष्ट झाला होता. त्यांचा आवाज ओढून ताणून काढल्यासारखा अस्पष्ट होता. त्यांनीं अद्याप विलासिनीचा हात घट्ट पकडून ठेवला होता.

'मुली, दूर जाऊं नकोस.' ते घोगऱ्या पण अगदीं हलक्या आवाजांत म्हणाले, 'आज जाऊं नकोस. मला बरें वाटल्याशिवाय जाऊं नकोस. मी एकटा आहें. फक्त रामलाल येथें आहे. मला असा सोडून तुला जातां येणार

नाहीं. तूं एक आठवडाभर घरांतच रहा. शरदला त्याच्या घरीं पाठव. एक आठवडाभर प्रवासाचा बेत पुढें ढकलला तर तुला वाईट वाटणार नाहीं ना ?'

तिनें उत्तर दिलें नाहीं. तिनें वेदनायुक्त नजरेनें शरदकडे व नंतर आशेनें डॉक्टरांकडे पाहिलें. डॉक्टरांनीं हळुवारपणें तिच्या पाठीवरून हात फिरवला.

'तूं त्यांना माझ्यावर सोंपव.' ते हळूच म्हणाले, 'त्यांना वाटतें तितकी त्यांची प्रकृति बिघडली आहे असें मला वाटत नाहीं. आपण लवकरच काय झालें आहे तें शोधून काढूं.' नंतर डॉक्टर आबासाहेबांकडे वळले, 'तुम्ही फार बोलत आहां. जरा शांत पडून रहा. येथें असलेली सर्व मंडळी कृपा करून बाहेर जातील काय ? होय. अगदीं सर्वांनीं बाहेर गेलें पाहिजे.'

डॉक्टरांनीं शांतपणें सर्वांना बाहेर काढलें. अगदीं सर्वांच्या मागें विलासिनी राहिली होती. तिनें आपणांला तेथेंच राहूं देण्यांत यावें अशी विनंति केली, पण आबासाहेबांनींच आपला दुर्बल हात हलवून तिला जाण्यास सांगितलें.

'जर मानकर म्हणतात तर तूंहि बाहेर जा.' ते हलक्या आवाजांत म्हणाले, 'मी लवकरच बरा होईन. मला आतांच बरें वाटत आहे.'

ती शरदचा हात धरून बाहेर गेली. दार बंद झाल्यानंतर ती त्याला बिलगली. 'शरद, काय झालें ?' तिनें हलक्या आवाजांत विचारलें.

'कांहीं नाहीं.' तो म्हणाला, 'मी त्यांच्याशीं बोलत होतों आणि एकाएकीं आरोळी ठोकून ते खालीं पडले. तें भयंकर होतें हें सर्व आजच घडायला हवें होतें काय ? त्यामुळें सर्व घोटाळा होणार अशी मला भीति वाटते. आपणांला ठरलेल्या वेळीं विमान गांठतां येणार नाहीं.'

'इतके ते कांहीं आजारी नसणार.' ती जोरांत म्हणाली, 'मला येथें आठवडाभर डांबून ठेवण्याइतके कांहीं ते आजारी नाहीत. असें घडलें तर तें फार भयंकर ठरेल. आपण इतकें सर्व ठरविल्यानंतर... ...'

आणखीं कांही दोघांपुरतेंच खाजगी बोलण्याची शक्यता नव्हती. कारण आतां रामलाल जवळ येऊन उभा राहिला होता. बाकीच्या पाहुण्यांनीं खेद व सहानुभूति प्रगट करण्यासाठीं तिच्याभोंवतीं गर्दी केली होती. ती एक अशी वेळ होती कीं कुणालाच काय योग्य बोलावें तें समजत नव्हतें आणि जें बोललें जात होतें तें सर्व निरर्थक होतें.

अगदीं थोडया वेळापूर्वीं त्या ठिकाणीं जो आनंदीआनंद पसरला होता तो आतां मावळला होता व हास्य–विनोदाचीं कारंजी बंद पडलीं होतीं. खेदजनक शांतता पसरली होती. प्रत्येकजण अगदीं हलक्या आवाजांत बोलत होता.

मिनिटे इतकीं सावकाश पुढें सरकतात हें त्या चिंताक्रांत नववधूला

यापूर्वीं कधींच अनुभवायला मिळालें नव्हतें. नंतर डॉ. मानकर बैठकीच्या खोलींतून बाहेर पडून तिच्याजवळ आले. त्यांची मुद्रा गंभीर आणि चिंता-क्रांतच दिसत होती.

'विलास, मी तुला फार चांगली बातमी सांगूं शकणार नाहीं अशी मला भीति वाटते.' ते मृदु स्वरांत म्हणाले, 'प्रकरण मला वाटत होतें त्याहूनहि गंभीर आहे. त्यांना झटका बसला आहे. त्यामुळें त्यांच्या जिवाला धोका आहे असें वाटत नसलें तरी तुझ्या वडिलांना संपूर्ण विश्रांतीची गरज आहे. शरीराप्रमाणेंच त्यांचें मनहि अगदीं शांत असलें पाहिजे. त्यांना बैठकीच्या खोलींतून हलवितां येणार नाहीं. मी त्या ठिकाणीं खाट ठेवण्याची व्यवस्था करीन.'

'म्हणजे—म्हणजे त्यांच्या प्राणाला धोका आहे ?' तिनें कातर स्वरांत विचारलें.

'नाहीं, अर्थातच नाहीं. पण मुली, तूं त्यांच्याजवळ राहिलें पाहिजे. ते जरा विक्षिप्तच आणि—'

'तें का मला माहीत नाहीं ?' ती खेदानें म्हणाली, 'पण शरीराप्रमाणें त्यांचें मनहि शांत असलें पाहिजे या तुमच्या बोलण्याचा अर्थ काय ?'

'जर ते लवकर बरे व्हायला हवे असतील तर त्यांच्या मनाला यत्किंचि-तहि चिंता वाटतां कामा नये. त्यांची अगदीं क्षुल्लक इच्छाहि आपण मान्य केली पाहिजे.' डॉक्टर म्हणाले, 'निदान एक आठवडाभर तरी तूं येथें रहावेंस अशी त्यांची इच्छा आहे. त्यामुळें तुझी आणि तुझ्या यजमानांची भयंकर निराशा होईल हें मला माहीत आहे.'

'तशी आवश्यकता असली तर आम्ही राहूं.' ती त्वरेनें म्हणाली, 'एका आठवड्यानें विशेष फरक पडणार नाहीं.'

'तुझ्या तें लक्षांत आलें नाहीं.' डॉक्टर अस्वस्थ होऊन म्हणाले, 'तूं रहावेंस अशी तुझ्या वडिलांची इच्छा आहे, पण तुझ्या नवऱ्यानें येथें रहावें अशी नाहीं. शरदकुमार, निदान एक आठवडाभर तरी तुम्हीं तुमच्या घरीं जावें आणि त्या अवधींत विलासशीं कसलाहि संबंध ठेवूं नये अशी त्यांची इच्छा आहे आणि तुम्हीं तसें वागण्याचें वचन दिलें पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे.'

'पण हा मूर्खपणा आहे !' शरद रागानें उद्गारला, 'हें अगदीं अयोग्य आहे—'

'मला तें मान्य आहे.' डॉक्टर मानकर म्हणाले, 'मी तुमच्याशीं पूर्ण सहमत आहें, पण आबासाहेबांची सध्यांची अवस्था इतकी नाजुक आहे कीं, आपण त्यांच्या या अवास्तव हट्टासंबंधीं त्यांच्याशीं चर्चाच करूं शकणार नाहीं. जर ते रागावले किंवा ते चिंता करूं लागले तर त्यांना मधांपेक्षां

जोरदार झटका येण्याचा संभव आहे जर त्यांना आठवडाभर शांत विश्रांति मिळाली तर ते अगदीं खडखडीत बरे होतील—'

'आणि आम्ही जर बाबांच्या म्हणण्याप्रमाणें वागलों नाहीं तर ?' विलासिनीनें विचारलें.

'तर मी तरी त्यांच्या प्राणाची जोखीम घेणार नाहीं.' मानकर गंभीर स्वरांत म्हणाले, 'विलास, तूं त्यांचें हें म्हणणें मानलेंच पाहिजे. आणि शरदकुमार, तुम्ही ताबडतोब तुमच्या घरीं जाल असेंहि वचन दिलें पाहिजे.'

क्षणभर शरद भयंकर चिडलेला दिसला. नंतर विलासिनी आपल्याकडे चितायुक्त नजरेनें पहात आहे असें दिसतांच त्याची मुद्रा सौम्य बनली.

'अर्थातच हा जर जीवन-मरणाचा प्रश्न असला तर मी त्यांच्या वेड्या लहरीप्रमाणें वागण्यास तयार आहें.' तो म्हणाला, 'विलास, आपलें दोघांचें दुर्दैव म्हटलें पाहिजे.'

ती बातमी अत्यंत वेगानें पसरली. त्या घराच्या छप्पराखालीं जें नाट्य घडत होतें त्याची सर्वांपेक्षां योग्य कल्पना सुधाकर करूं शकत होता. तो आतां पूर्ण शुद्धीवर आला होता. बैठकीच्या खोलींत बसलेल्या धक्क्यानें त्याची धुंदी क्षणांत उतरली होती.

'अरे देवा ! त्या हरामखोर-पाजीला आतां ती मिळणार नाहीं !' तो स्वतःशींच म्हणाला, 'मीं जें ऐकलें त्यामुळें त्याला ती मिळणें अशक्यच आहे !'

चंद्राला ग्रहण लागतें त्याप्रमाणें विलासिनीच्या मधुचंद्रालाहि ग्रहण लागलें होतें !

## ३ : झुंजार, तूं एकाला ठार कर !

'त्या वृद्ध सैतानाला शिक्षा झाली तर ! मला त्याबद्दल सहानुभूति वाटतें असें मात्र नाहीं.' संध्याकाळच्या वर्तमानपत्रावरून नजर फिरवीत झुंजार म्हणाला.

'पण हा वृद्ध सैतान कोण ?' विजयेनें विचारलें, 'तुम्हांला पूर्वी भेटलेला कुणी तुमचा बदमाष मित्र ?'

'हें बघ, पहिली गोष्ट म्हणजे माझा कुणी बदमाष मित्र नाहीं.' झुंजार म्हणाला.

'तर मग हा वृद्ध सैतान कोण ?'

'दिवाणबहादूर आबासाहेब गरूड. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ते अर्थातच आतां ती पदवी लावीत नाहींत.'

विजया प्याल्यामध्यें कॉफी ओतीत होती. तिनें तें काम थांबवून आपल्या साहसी नवऱ्याकडे टक लावून पाहिलें.

'तुमचें डोकें फिरलें आहे काय ?' तिनें आश्चर्यानें विचारलें, 'सुप्रसिद्ध वकील आबासाहेब गरुडांच्या सुंदर मुलीचा आज सकाळींच विवाह झाला. मीं दुपारच्या वर्तमानपत्रांनीं छापलेले फोटो पाहिले. नवरा मुलगा शरद फारच सुंदर आहे. ती खरोखरच सुदैवी आहे. शरद श्रीमंत आहे, वैमानिक म्हणून काम करतो. पण तें जाऊं द्या. तुम्ही वृद्ध सैतान असें कां म्हणालां?'

तिनें त्याच्या हातांत कॉफीचा प्याला दिला. त्यावेळीं रात्रीचे साडे दहा वाजले होते आणि झुंजार महालाच्या पांचव्या मजल्यावरील गच्चींत बांधलेल्या सुंदर बंगल्यांतील आरामशीर बैठकीच्या खोलींत तीं दोघेंच होतीं.

'विजू, एक तर तूं चेष्टा करीत असावीस किंवा तुझ्या स्मरणशक्तीवर गंज चढला आहे.' झुंजार म्हणाला, 'वृद्ध आबासाहेब दृष्टि अधु बनल्यामुळें कांहीं वर्षांपूर्वी सेवानिवृत्त झाले आहेत. फौजदारी कोर्टांत त्यांच्या तिखट जिभेमुळें आणि हल्ला करण्याच्या पद्धतीमुळें त्यांना 'जहरी वकील' असें टोंपण नांव पडलें होतें. तूं येरवडा, हिंदलगा वगैरे तुरुंगांत अडकलेल्या कैद्यांना त्यांच्याबद्दलचें मत विचार, त्यांचीं जवळजळीत बोलणीं ऐकून तुझ्या कानांत फोड येतील.

'सरकारतर्फे खटले चालवीत असतांना आरोपी व त्याचे वकील यांची ते गाळण उडवीत. अनेक लोक त्यांना खुनशी आणि पूर्वग्रहदूषित म्हणत. कांहींतरी ते म्हणजे न्यायदेवतेवरील कलंक आहेत असेंहि सांगत. जेव्हां ते सेवानिवृत्त झाले तेव्हां अनेकांना अतिशय आनंद झाला होता.'

'पण ते खरोखरच वाईट होते कीं काय ?' तिनें विचारलें.

'मला त्याबद्दल शंका आहे.' झुंजार म्हणाला, 'जे त्यांच्याबद्दल वाईट बोलत होते ते गुन्हेगारच होते आणि त्यांनीं तें तसें सिद्ध केलें हें त्या बेटयांना आवडलें नव्हतें. आबासाहेब अत्यंत बुद्धिमान वकील होते यांत शंकाच नाहीं. गेल्या वीस वर्षांतले मी तुला पांच सहा तरी असें खुनी दाखवीन कीं जे आबासाहेब त्यांच्याविरुद्ध होते म्हणूनच फांसावर चढले.'

'तर मग तुम्ही त्या वृद्ध सैतानाला शिक्षा झाली तर, असें कां म्हणालांत ?' कॉफीचे घुटके घेत विजयेनें विचारलें, 'त्यांच्या मुलीचें लग्न झालें ही त्यांना शिक्षा झाली असें तुम्ही म्हणणार नाहीं. ती फार सुंदर मुलगी आहे.'

'मान्य आहे.' सकाळच्या वर्तमानपत्रांतील विलासिनीचा फोटो आत्मीयतेनें न्याहाळीत झुंजार म्हणाला, 'ही खरोखरच सुंदर आहे. तिचे निळे डोळे, टवटवीत गाल, सरळ नाक—'

'आपण तिच्याबद्दल बोलत नाहीं. तिच्या वडिलांबद्दल बोलत आहोंत!' विजया घाईघाईनें म्हणाली, 'तिच्या सौंदर्याचें इतकें तपशीलवार वर्णन

नको--'

'अग पण मी केवळ या फोटोबद्दल बोलत आहें. ती फार सुंदर आहे असें तूंच तर म्हणालीस.' झुंजार हंसून म्हणाला, 'होय, आपण तिच्या बापाबद्दल बोलत आहोंत. फारच वाईट प्रकार...'

'पण थाटामाटाच्या लग्नाला तुम्ही वाईट प्रकार असें म्हणतां? त्या भागांत तशा प्रकारचा विवाह–समारंभ पन्नास वर्षांत झाला नाहीं असें म्हणतात. खूप बडीं माणसें हजर होतीं. स्वत: आबासाहेब प्रत्येकाचें स्वागत करीत होते...'

'माझ्या हातांत सायंदैनिकाचा जादा अंक आहे.' झुंजार म्हणाला, 'त्या समारंभाचा शेवट दुर्दैवी झाला. वर आणि वधु मधुचंद्रासाठीं निघण्याच्या तयारींत असतांना आबासाहेबांना अर्धांगवाताचा झटका आला. त्यामुळें मधुचंद्र रद्द झाला. वधु बापाजवळ शुश्रूषेसाठीं राहिली आणि बिचारा वर एकटाच आपल्या घरीं निघून गेला.'

'किती खेदजनक!' विजया मन:पूर्वक म्हणाली, 'पण त्यासंबंधीं मला वर्तमानपत्रांत कांहींच वाचायला मिळालें नव्हतें.'

'मला त्या म्हाताऱ्याबद्दल विशेष सहानुभूति वाटत नाहीं, पण त्या दोघांबद्दल मात्र वाईट वाटतें' झुंजार म्हणाला, 'त्याच्याबद्दल सांगण्यांत येणाऱ्या गोष्टी अतिरंजित असतील, पण पेटल्याशिवाय धूर निघत नाहीं ही सामान्य म्हण आहे. तो माणूस फार कठोरच होता. या वर्तमानपत्रानें म्हटलें आहे कीं, तो म्हातारा आजपर्यंत कधींच हंसतांना दिसला नव्हता. मला वाटतें, त्या सर्व गोष्टींचा त्याच्यावर फार ताण पडला आणि त्यामुळेंच त्याला झटका आला.'

टेलिफोनची घंटा वाजली. 'कोण?' झुंजार रिसीव्हर कानाला लावून म्हणाला, 'होय मीच...कोण? ...अरेच्चा!' त्यानें रिसीव्हर हातानें दाबून धरला आणि तो विजयेकडे वळून म्हणाला, 'सैतानाचें नांव काढतांच तो हजर झाला! अग तो हंसरा म्हाताराच!' नंतर तो पुन्हां रिसीव्हरमधून बोलूं लागला. 'आबासाहेब, जर तुम्हीं नांव सांगितलें नसतें तर कुणी भलत्याच नंबराशीं बोलत आहे असें मला वाटलें असतें. बोला, मी आपणांसाठीं काय करूं शकेन?'

'झुंजारराव, तुम्ही घरींच आहांत याचा मला आनंद होतो.' रिसीव्हरमधून थकलेला, हळू आवाज ऐकूं आला– 'तुम्हांला अशा भलत्याच वेळीं टेलिफोन केल्याबद्दल मीं तुमची क्षमा मागायला हवी...'

'भलतीच वेळ हें तुम्हांला कुणीं सांगितलें?' झुंजार मध्येंच म्हणाला, 'आतां फक्त साडे–दहाच वाजले आहेत. म्हणजे नुकतीच संध्याकाळ संपत आहे. वर्तमानपत्रांना चुकीची बातमी पुरविण्यांत आली असावी. मी आतांच

तुम्हांला दुपारीं कांहीं झटका आला असें वाचीत होतों.'

विजया जवळ उभी राहून झुंजार काय बोलतो हें लक्षपूर्वक ऐकत होती.

'झुंजारराव, तुम्हीं वर्तमानपत्रांत जें वाचलें तें बरोबर होतें.' आबासाहेब गरूड म्हणाले, 'मी आजारी आहें. कदाचित् मृत्यूच्या दारीं पडलेंही असेन. म्हणूनच मी तुम्हांला विनंति करीत आहें. तुम्ही तुमच्या मोटारीनें तावडतोब माझ्या घरीं या. मी तुमच्यावर एक तातडीची कामगिरी सोंपविणार आहें.'

'कांहीं चूक होत असावी असें अद्यापहि मला वाटतें.' झुंजार म्हणाला, 'तुम्ही तुम्हांला हव्या असलेल्या झुंजारशींच बोलत आहां अशी तुमची खात्री आहे ना?'

'तुमचें नांव झुंजारराव ना? आडनांव सेनापति.' आबासाहेबांचा कठोर आणि धारदार आवाज ऐकूं आला, 'तुम्ही मरीन ड्राइव्हवरील झुंजारमहालांतून बोलत आहांत ना?'

'आबासाहेब, हें सर्व एकदम बरोबर.' झुंजार म्हणाला, 'तेव्हां नंबर चुकला नाहीं. पण तुम्ही माझ्यावर कामगिरी सोंपविण्याबद्दल जें बोललांत त्याबद्दल मला भीति वाटते कीं मी...'

'थांबा! हा माझ्या जीवनमरणाचा प्रश्न आहे व हें मी मनःपूर्वक सांगत आहें आणि माझ्या माहितीप्रमाणें फक्त तुम्हीच एक मला मदत करूं शकाल.' आबासाहेब म्हणाले, 'झुंजारराव, एका मृत्युशय्येवर पडलेल्या माणसाची ही विनंति तुम्ही कृपा करून झिडकारूं नका. तुम्ही याल ना?'

'होय!' झुंजार लागलीच म्हणाला.

त्याला समाधानाचा दीर्घ निःश्वास ऐकूं आला. कधीहि न घटमळणाऱ्या झुंजारनें तडकाफडकीं निर्णय घेतला होता. पण तो आतां अधिकच बुचकळ्यांत पडला होता.

'छान! झुंजारराव, मी तुमचा आभारी आहें.' आबासाहेब म्हणाले, 'आतां ऐका—काळजीपूर्वक ऐका.'

'मी तेंच तर सुरुवातीपासून करीत आहें.' झुंजार म्हणाला.

'ठाणें शहरापासून एका मैलावर आमचा 'गरुड–भरारी' वाडा आहे. तुम्हांला तो सहज सांपडेल. पण तुम्ही कृपा करून मोटार आवारांत आणूं नका. फाटकापासून बंगला फार दूर नाहीं. मोटार रस्त्यावरच उभी करा आणि जेव्हां तुम्ही घराजवळ याल तेव्हां तुम्हांला असें दिसून येईल...'

झुंजारच्या मिष्किल नजरेंत आतां कुतूहल निर्माण झालें होतें. विजयेनें तें पाहिलें आणि तिला हजार प्रश्न विचारावे असें वाटूं लागलें. पण झुंजारचें बोलणें पूर्ण होईपर्यंत ती कशीतरी थांबली.

'हा काय प्रकार आहे ?' त्यानें रिसीव्हर खालीं ठेवतांच तिनें विचारलें.

'प्रकरण मोठें रहस्यमय आहे.' सिगारेट पेटवीत झुंजार हंसून म्हणाला, मी काय करूं शकेन अशी त्या वृद्ध सैतानाची कल्पना आहे तें मला समजत नाहीं. पण त्याचें काम कांहीं तरी विशिष्ट प्रकारचें असावें यांत शंका नाहीं.'

'पण तुम्हीं रिसीव्हर खालीं ठेवतांच 'ताबडतोब निघतों' असें म्हणालांत.' विजया मध्येंच म्हणाली, 'तुम्ही आज रात्रींच तेथें जाणार आहांत ?'

'मी नुसता जाणारच नाहीं पण जगावेगळ्या प्रकारें त्यांच्या बंगल्यांत प्रवेश करणार आहें.' झुंजार हंसत म्हणाला, 'त्यांच्या सूचना अगदीं कांटेकोरपणें पाळायच्या आहेत. मोटार रस्त्यावर उभी करायची, आवारांत पायीं जायचें, बंगल्यांत अंधार असेल. सर्वजण झोंपले असतील. फक्त जेथून त्यांनीं टेलिफोन केला त्या बैठकीच्या खोलींत ते एकटेच जागे असतील. फक्त ती खिडकी उघडी असेल व तेथेंच थोडासा प्रकाश असेल.'

'हा काय अजब प्रकार ?' विजयेनें आश्चर्यानें विचारलें.

'मलाहि तेंच वाटतें' झुंजार म्हणाला, 'मीं खिडकींतून प्रवेश करावयाचा. तेथें गेलों हें कुणाला कळूं द्यावयाचें नाहीं. गुप्तपणें प्रवेश करायचा आणि गुप्तपणेंच तेथून बाहेर पडावयाचें. आम्हां दोघांची बैठक अत्यंत गुप्त स्वरूपाची होणार.'

'मला हें कांहीं आवडत नाहीं.' विजया म्हणाली.

'इथें मतभेद आहे' झुंजार म्हणाला, 'मला तें फारच आवडतें. त्या म्हाताऱ्याला दुपारीं झटका आला. त्यानें आपल्या मुलीचा मधुचंद्र रद्द करविला. बिचारे पाहुणे एक शब्दहि न बोलतां घरांतुन बाहेर पडले. दुपारची मेजवानी रद्द ! त्या म्हाताऱ्याला बैठकीच्या खोलींतच बसावें लागलें आणि आतां तो अशा रात्रीच्या वेळीं टेलिफोन करून मला अशा विचित्र प्रकारें भेटावयास बोलावितो. मला वाटतें, त्याचें डोकें फिरलें आहे आणि माझी मेहनत फुकट जाणार आहे.'

'किंवा तुम्हांला घरफोडीच्या आरोपामुळें पोलिसांच्या कोठडींत पडावें लागेल !' विजया म्हणाली, 'हा सांपळा नसेल कशावरून ? तुम्हीं सावध असलें पाहिजे. ज्यानें टेलिफोन केला तो आबासाहेब कशावरून ?'

'जर खुद्द त्या म्हाताऱ्यानेंच टेलिफोन केला नसता तर मला असली कामगिरी सांगण्यांत दुसऱ्या कुणाचा हेतूच काय ? शिवाय तीन–चार वर्षांपूर्वीं मी कोर्टांत असतांना...'

'तुम्हांला कोर्टांत उभें करण्यांत आलें होतें ? खात्रीनें ती आपल्या लग्नापूर्वींची गोष्ट असावी.' विजया म्हणाली.

'मूर्ख विजू, मला कोर्टांत उभें करण्यांत आलें नव्हतें. मी एक खटला ऐकावयास गेलों होतों व त्यावेळीं आबासाहेबांचा भरपूर आवाज ऐकला. त्यांचें निर्भय, कठोर व मर्मभेदी बोलणें अद्याप मी विसरलों नाहीं. तेव्हां आवाज त्यांचाच होता आणि मी आतां गरुड–भरारीमध्यें जाणार आहें.'

'आपण जाणार आहोंत.' विजया म्हणाली, 'तुम्ही जाणार असलांत तर मीहि जाणारच !'

'भलताच हट्ट धरूं नकोस.' झुंजार म्हणाला, 'तूं तेथें येऊन करणार काय ? शिवाय मीं ऐकटेंच आलें पाहिजे असें त्या म्हाताऱ्यानें बजाविलें आहे. तूं आतां एखाद्या शहाण्या मुलीप्रमाणें शांत झोंपणार आहेस. मी परत आल्यानंतर तुला सर्व सांगेन '

पण शेवटीं विजयेच्या हट्टापुढें झुंजारला नेहमींप्रमाणें माघार घ्यावी लागली आणि आणखीं पांचच मिनिटांनीं ती जोडी विजयेच्याच मोटारीनें झुंजार महालांतून बाहेर पडली. आणि अर्ध्या तासांतच त्या वेगवान् मोटारीचें मुक्कामाचा पल्ला गांठला. झुंजारनें मोटार फाटकासमोर पुढें नेऊन पुढच्या कोंपऱ्यावर उभी केली.

'विजू मला फार वेळ लागणार नाहीं.' तो मोटारींतून खालीं उतरतांना म्हणाला, 'जर मी एका तासांत बाहेर आलों नाहीं तर तूं माझ्या सहाय्याला धांवून ये. जर तुला या रात्रीच्या वेळीं रहस्यमय किंकाळचा ऐकूं आल्या ...'

'हें पहा, असें चेष्टेनें बोलूं नका.' ती म्हणाली, 'पूर्वींच मला ही कामगिरी आवडली नव्हती आणि आतां तर मुळींच आवडत नाहीं. ही जागा खरोखरच रहस्यमय आहे. कुठें चुकूनसुद्धां प्रकाशाचा लहानसा कवडसाहि दिसत नाहीं.'

'रात्रीच्या वेळीं बाहेरगांवच्या सर्व जागा अशाच दिसतात.' तो हंसून म्हणाला, 'तूं भलत्याच कल्पना मनांत आणूं नकोस.'

'पण मी तुमच्याबरोबर आलें तर चालणार नाहीं काय ?'

'अर्थातच चालणार नाहीं. मी एकटाच येईन असें त्या बोकोबाला वचन दिलें आहे. पण यांत खरोखरच कांहीं धोका नाहीं.'

'मी धोक्याला घाबरलें असें तुम्हांला वाटतें कीं काय ?' तिनें विचारलें, 'पण मला तुमच्याबरोबर त्या गंमतींत भाग घ्यायचा होता.'

त्यानें चुंबनानें तिचें तोंड बंद केलें आणि तेथून तो निघाला. झुंजार आवारांत शिरला. घराच्या फक्त एकाच अगदीं बाजूच्या खिडकींत थोडासा प्रकाश आहे हें त्यानें दुरूनच पाहिलें. त्या खिडकीवर जाड पडदा होता. पण फटींतून थोडा प्रकाश बाहेर डोकावीत होता.

'तीच ती बैठकीची खोली !' झुंजार स्वतःशींच म्हणाला, 'आराम-

खुर्चीवर म्हाताऱ्याचें प्रेत पडलें आहे असें मला खात्रीनें दिसणार नाहीं. कारण तसल्या गोष्टी फक्त रहस्यकथांतच घडतात.'

त्याचें तें म्हणणें बरोबर होतें. त्यानें त्या खिडकींतून आंत प्रवेश करतांच त्याला एका खुर्चीवर बसून चिरूट ओढणारे आबासाहेब गरूड दिसले. आणि म्हणे त्यांना अर्धांगवायूचा झटका आला होता ! त्यांच्या डोळ्यांवर काळा चष्मा नव्हता. त्यांनीं आवाज ऐकतांच त्याच्याकडे मान फिरविली. अर्थातच त्यांना तो दिसत नव्हता. ' झुंजारराव ?' त्यांनीं अगदीं हलक्या आवाजांत विचारलें.

' होय आबासाहेब, मीच.' तो म्हणाला.

' तरुण गृहस्था, अगदीं हलक्या आवाजांत बोल. आणि अगदीं माझ्या पुढयांत स्तब्ध उभा रहा ! छान !' त्यांनीं एक अवाढव्य सूक्ष्मदर्शक कांच उचलून झुंजारच्या तोंडावर अठरा इंचांवर धरली आणि त्याचें बारकाईनें निरीक्षण केलें.

'होय, तूंच झुंजार.' ते उत्तेजित स्वरांत म्हणाले, ' मीं तुझे फोटो पाहिले आहेत. या माझ्या विचित्र वागणुकीबद्दल तूं मला क्षमा केली पाहिजे माझी दृष्टि पूर्वीसारखी नाहीं. तूं ती खुर्ची माझ्याजवळ घेऊन बैस.'

झुंजार खालीं बसला आणि त्यानें नम्रतेनें विचारलें, ' आबासाहेब, मीं तुमचें कोणतें काम करावें ?'

गरुडांनीं त्याच्याकडे पहात म्हटलें, ' झुंजार, तूं माझ्यासाठीं एका माणसाला ठार केलें पाहिजे !'

## ४: भाडोत्री मारेकरी !

झुंजार काय ऐकण्याचीं अपेक्षा करीत होता हें त्याचें त्यालाहि सांगतां आलें नसतें, पण इतक्या शांततेनें व हेतुपूर्वक उच्चारलेले अनपेक्षित शब्द ऐकून त्याला आश्चर्य वाटलें होतें.

' छान ! मीं एका माणसाला ठार करावें एवढेंच तुमचें म्हणणें आहे.' झुंजार म्हणाला, ' पण मीं त्याला कशाप्रकारें ठार करावें ? विषप्रयोगानें, गळा दाबून कीं छातींत खंजीर खुपसून ?'

' झुंजार, कृपा करून चेष्टा करूं नकोस.' आबासाहेब गरूड म्हणाले.

' आबासाहेब, मी तुमची चेष्टा करीत नाहीं, पण मी खूष झालों नाहीं.' झुंजार म्हणाला, ' आणि कोण चेष्टा करणार नाहीं ? तुम्ही कांहीं हें मनःपूर्वक बोलत नाहीं.'

' मी इतक्या गंभीरपणें उभ्या आयुष्यांत बोललों नाहीं.' ते आपल्या कठोर आवाजांत म्हणाले, ' जो बारा वर्षांपूर्वींच फांसावर चढला असता पण ज्युरीच्या गाढवपणामुळें निसटला अशा एका तरुण सैतानाला तूं ठार

करावें असें माझें म्हणणें आहे.'

'तुम्हांला कुणाहिपेक्षां ज्युरीचा जास्त अनुभव असणार.' झुंजार म्हणाला 'ज्युरीला उद्देशून बोलण्यांत तुम्हीं तुमची सारी हयात घालविली आहे साहेब, याच गोष्टीबद्दल मीं अनेकदां विचार केला आहे ज्युरीचे सभासद नेहमींच गाढव असतात कीं तुम्ही एका विशिष्ट ज्युरीबद्दल बोलत आहां?'

'झुंजार, तूं अद्यापहि चेष्टाच करीत आहेस.' त्यांनीं दोष दिला.

'पण आबासाहेब मला मूर्ख ठरविण्याचाच आपला हा प्रयत्न नाही काय?' झुंजार मध्येंच म्हणाला, 'तुम्हीं याचा खुलासा केला पाहिजे तुम्ही अंथरुणाला खिळलेले असणार अशी माझी कल्पना होती आणि तुम्ही आरामखुर्चीवर आरामानें बसून खुशाल सिगारेट ओढीत आहां.'

'होय, मी तें विसरलोंच! खुलासा करायला हवाच.' आबासाहेब अधीरतेनें म्हणाले, 'लोकांची समजूत आहे तसा झटका मला आला नव्हता अचानक अगदीं विलक्षण परिस्थिति निर्माण झाली —आणि—'

'आणि तुम्हांला नाटक करणें भाग पडलें?' झुंजारनें तें अडखळतच विचारलें.

'होय, पण तें कुणालाहि—माझ्या मुलीला किंवा मुलालाहि माहीत नाहीं.'

'आणि डॉक्टरांना?' झुंजारनें विचारलें.

'डॉक्टर मानकर हे माझे जुने मित्र आहेत. त्यांना मीं विश्वासांत घेतलें आहे.' अधिऱ्या स्वरांत आबासाहेब म्हणाले, 'निदान काय करावें आणि काय बोलावें एवढें तरी मीं त्यांना पटविलें होतें. मात्र मी अशी बतावणी कां करतों हें त्यांना सांगितलें नाहीं. माझें डोकें फिरलें आहे व माझ्या मनाप्रमाणें वागलें पाहिजे अशी त्यांची समजूत आहे. मी हळूहळू बरा होईन आणि मला आशा आहे कीं तोंपर्यंत तूं कामगिरी फत्ते करशील.'

'म्हणजे ती क्षुल्लक खून करण्याचीच कामगिरी ना?' झुंजारनें विचारलें.

'तूं याला खून म्हटलें नाहींस तर बरें होईल.' ते रागानें म्हणाले.

'तर त्याला दुसरें काय नांव देणार?'

'मी त्याला न्याय म्हणेन... तूं ज्याला ठार करावेंस असें मीं सांगितलें तो माणूस...'

'बडे भाई, जरा थांबा.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'तुम्हीं तुमचें गुपित फोडण्यापूर्वीं मी तुम्हांला सावधगिरीचा इषारा देतों कीं मी खुनाचीं कामें अंगावर घेत नाहीं. आणि तुम्हीं माझीच निवड कां करावी?'

डॉक्टर मानेकरांचेंच मत बरोबर आहे अशी झुंजारची खात्री पटली होती. त्या म्हाताऱ्याचें डोकें फिरलें होतें!

'झुंजार, अशा प्रकारची कामगिरी फक्त तूंच करूं शकशील. मला तुझा सर्व इतिहास माहीत आहे. तूं साहसी तरुण आहेस, तुला संकटाची आणि कायद्यांची मुळींच पर्वा नाहीं. कायदा धाब्यावर बसविण्याचें तर तूं कंकणच बांधलें आहेस. अनेकदां तूं एक भयंकर सामाजिक धोका आहेस असें माझें मत बनलें होतें पण मी नाइलाजानें मनांतून तुझी प्रशंसाहि करीत होतों.'

'आबासाहेब, याबद्दल मी तुमचे मनःपूर्वक आभार मानतों.' झुंजार म्हणाला.

'तूं जें कांहीं साध्य केलेंस त्याचें मला कौतुक वाटे, पण तें करण्याची तुझी पद्धति मला आवडत नसे' आबासाहेब पुढें म्हणाले, 'पण तुझ्यासारख्या माणसाची मदत घेण्याइतका मीच एखाद्या बिकट पेंचांत सांपडेन असें मात्र माझ्या स्वप्नींहि आलें नव्हतें. झुंजार, फक्त तूंच मला मदत करूं शकशील. मी श्रीमंत आहें. तुला यश मिळालें तर मी एक लक्ष रुपये देईन.'

झुंजार मनांतून हंसला. एक लक्ष रुपये ही कुणालाहि मोह पाडणारी फार मोठी रक्कम आहे असें आबासाहेब गरुड मानीत होते. पण झुंजार हा कोटयाधीश आहे हें त्यांना माहीत नव्हतें.

'आबासाहेब, तुम्हीं आपलें गुपित फोडूं नये असें अद्यापहि मला वाटतें.' झुंजार म्हणाला, 'पण तुम्ही सांगणारच असला तर मी तुमचे तोंड दाबूं शकणार नाहीं. मीं कुणाला ठार करावें असें तुम्हांला वाटतें ?'

'शरदला.' आबासाहेब म्हणाले.

'शरद–तुमचा जांवई ?' आश्चर्यानें झुंजारनें विचारलें.

'तो केवळ नाममात्रच जांवई आहे. याबद्दल मी ईश्वराचे आभार मानतों. आज सकाळींच त्याचें लग्न झालें. मीं त्यांच्या मधुचंद्राचा बेत हाणून पडला आणि त्याला त्याच्या घरीं पाठविलें.'

म्हातारा इतका वेडा नसावा असें झुंजारला वाटूं लागलें. त्या वेडांतहि पद्धति होती.

'तूं शरदला असा ठार कर कीं जगाला तो अपघाती मृत्यु वाटावा आणि हें तूं माझ्यासाठीं केलें पाहिजे. तूं तें कसें साधावेंस तें तुझें तूंच–'

'थांबा आबासाहेब.' झुंजार रागानेंच म्हणाला, 'मी भाडोत्री मारेकरी नाहीं ! रामराम' तो उठून उभा राहिला, 'तुम्हीं जें मला विश्वासांत घेऊन सांगितलें त्याचा मी कुणाजवळहि उच्चार करणार नाहीं, पण तुम्हीं त्यासंबंधीं आणखीं कांहीं बोलूं नये असा माझा तुम्हांला सल्ला आहे !'

क्षणभर आबासाहेब भयंकर रागावले, पण दुसऱ्याच क्षणीं त्यांची मुद्रा चिंतायुक्त आणि घाबरलेली दिसूं लागली, 'थांब झुंजार ! आधीं माझें पुरतें ऐक !' ते म्हणाले.

झुंजार बसला पण त्यांनीं आपणांला भाडोत्री मारेकरी ठरवावें हें त्याला मुळीच आवडत नव्हतें, पण यापूर्वींहि कित्येकांनीं त्याच्या बाबतींत तीच चूक केली होती. तेव्हां निदान त्यांचें सर्व बोलणें ऐकण्यास तरी हरकत नव्हती.

'आज दुपारीं मी अतिशय आनंदांत होतों.' ते म्हणाले, 'माझ्या लाडक्या मुलीचा एक सुंदर आणि नांवाजलेल्या माणसाबरोबर विवाह झाला होता आणि मला तें पसंत होतें. ती गेले कित्येक महिने त्याची वाखा-णणी करीत होती. गेलीं कित्येक वर्षे माझी दृष्टि अधु बनली आहे आणि आतांपर्यंत त्या माणसाला जवळून पहाण्याची मला संधीच मिळाली नव्हती. आज दुपारीं त्यानें स्वतःच मला एका फुटावरून स्वतःचा चेहरा दाखविला आणि आपण रघुवीर तिरंदाज आहोंत असें मला सांगितलें.'

'रघुवीर तिरंदाज ? मला तें नांव ओळखीचें वाटतें' झुंजार म्हणाला.

'तुला तें कां ओळखीचें वाटतें तें मी सांगतों.' आबासाहेब म्हणाले, 'बारा वर्षांपूर्वी व त्यानंतरच्या दोन वर्षांत त्या नांवाला अतिशय प्रसिद्धि मिळाली होती ...'

'जरा थांबा ! मला थोडें आठवूं लागलें आहे.' झुंजार म्हणाला, 'त्या तरुणाचा बाप सज्जन आणि धार्मिक प्रवृत्तीचा होता. त्यानें अत्यंत निर्दयतेनें एका मुलीचा खून केला होता !'

'मी तुला सविस्तर हकीकत सांगतों.' आबासाहेब म्हणाले, 'त्या मुलीचें नांव आनंदी मोरे असें होतें. मी त्या खटल्यांत सरकारी वकील म्हणून काम करीत होतों. मीं इतका उलटचा काळजाचा, खुनशी आणि तरुण सैतान पूर्वीं पाहिला नव्हता. चेहरा साळसूद, अगदीं अस्खलितपणें सहज खोटें बोलणारा. त्यानें तो खून करतांना कांहीं अमल केला नव्हता. त्यानें त्या बिचाऱ्या तरुणीची मान कापली, नंतर सुऱ्यानें तिचें हृदय बाहेर काढून त्याचे तुकडे केले त्यावेळीं ती बातमी भारतांतील प्रत्येक वर्तमानपत्रानें छापली होती. त्याचा कुणीं बचाव केला नव्हता खटला कांहीं दिवसांतच आटोपला. तो अपराधी आहे असें सिद्ध झालें होतें.'

'तसें होतें तर ...'

'तर त्याला फांसावर चढवायला हवें होतें हें तुमचें म्हणणें बरोबर आहे.' आबासाहेब म्हणाले.

'आणि त्याचा बचाव करणारेंहि कुणी नव्हतें ना ?' झुंजारनें विचारलें, 'त्यानें आपला अपराध कबूल केला होता काय ?'

'नाहीं. तो धूर्तपणानें खोटें बोलला होता, पण त्याचा उपयोग झाला नव्हता. त्याला डोळे वटारलेल्या व त्याचे हात व कपडे रक्तानें माखलेल्या अवस्थेंत त्या तरुणीच्या घरांतून बाहेर पडतांना पहाणारे अनेक साक्षीदार

झाले. त्याचे ठसे सांपडले होते. मी तें सविस्तर वर्णन करीत नाहीं. त्याला फांसावरच चढवायला हवें होतें. पण त्या नालायक आणि महामूर्ख ज्युरीनें 'अपराधी, पण वेडा' असा निर्णय दिला आणि त्यामुळें तो फांसांतून निसटला.'

'आणि त्याला येरवड्याला वेड्यांच्या हॉस्पिटलांत पाठविण्यांत आलें असेल ?'

'होय. त्या धक्क्यानें त्याचा आजारी बाप मरण पावला. त्यानंतर एका वर्षाच्या आंत त्याची आईहि देवाघरीं गेली. नंतर तो त्या हॉस्पिटलांतून फरारी झाला आणि तो पोलिसांना सांपडलाच नाहीं. त्यानें आत्महत्या केली असें मानलें जात होतें आणि वर्षामागून वर्षें गेलीं तरी त्याच्याबद्दल कुणा-लाच कांहीं समजलें नव्हतें.'

'आणि आतां ?' झुंजारनें विचारलें.

'आतां त्यानें आत्महत्या केली नाहीं हें मला समजलें आहे.' आबासाहेब म्हणाले, 'त्यानें शरद हजरनवीस असें नांव धारण करून वैमानिक खात्यांत नोकरी मिळविली. तो हुषार आहे हें नाकारतां येणार नाहीं. तो त्वरेनें नांवलौकिकास चढला आणि आतां याच माणसानें माझ्या मुलीबरोबर लग्न केलें आहे.'

'शरदनें लग्न केलें, तोच रघुवीर तिरंदाज आहे असें तुम्हीं गृहीत कां धरावें ?' झुंजारनें विचारलें.

'गृहीत धरलें ! अरे देवा ! आज दुपारीं अगदीं याच खोलींत तो मला भेटला व आपण रघुवीर तिरंदाज आहोंत हें त्यानेंच मला सांगितलें. त्यानें आपला चेहरा माझ्या अगदीं जवळ आणून मला खात्री करण्यास सांगितलें. आपण सूड उगवण्यासाठींच लग्न केलें असें तो म्हणाला. खटल्याच्या वेळीं मीं ज्युरीचें मन कलुषित केलें असा त्यानें माझ्यावर आरोप केला आणि आतां तुम्ही काय करतां तें पहातों अशी त्यानें मला धमकीहि दिली.'

'हा प्रकार वाईट आहे यांत शंका नाहीं.' झुंजारनें कबुली दिली.

'तूं शांतपणें बसून एवढेंच बोलणार ?' जोरानें श्वासोच्छ्वास करीत त्यांनीं विचारलें, 'त्या माणसानें माझ्या मुलीबरोबर विवाह करून सूड उगविला आहे. झुंजार ! एका फांशीची शिक्षा झालेल्या खुनी बदमाषाची ती पत्नी बनली आहे ! झुंजार, या बाबतींत कांहीं करायला नको काय ?'

'पण आतांपर्यंत तरी ती केवळ नांवाचीच पत्नी आहे.' झुंजार म्हणाला.

'होय. त्याबद्दल ईश्वराचे आभारच मानायला हवेत ! आतां माझ्या मनाची स्थिति काय झाली आहे याची तुला कल्पना आली असेल. झुंजार, त्याला ठार करणें हा एकच उपाय आहे आणि तो शरद म्हणूनच मेला पाहिजे. तो रघुवीर तिरंदाज आहे हें जगाला कधींच समजतां कामा नये.'

'मला वाटतें, म्हणूनच तुम्हीं पोलिसांना माहिती दिली नसणार ?'

'मीं पोलिसांकडे जावें म्हणून त्यानें मला हंसतच आव्हान दिलें. तो दहा वर्षें मोकळा होता. त्या अवधींत तो शहाणा आहे हें त्यानें सिद्ध केलें आहे. कायदा आपलें कांहींच वांकडें करूं शकणार नाहीं. वाटल्यास मीं त्याच्याविरुद्ध वकील म्हणून उभें रहावें असें त्यानें हंसतच सांगितलें.'

'त्याच्या त्याहि म्हणण्यांत कांहीं अर्थ आहे.' झुंजार म्हणाला.

'पण तो वेडाच आहे !' आबासाहेब जोरांत म्हणाले, 'आज दुपारीं माझ्याशीं बोलतांना तो किती हिडीस दिसत होता याची तुला कल्पना नाहीं मी पोलिसांना कशी माहिती देऊं ? त्यामुळें माझ्या मुलीवर किती भयंकर परिणाम झाला असता याची तूं कल्पना कर.'

'आपला नवरा लग्नानंतर कांहीं तासांच्या आंत अपघातांत ठार झाला असें समजलें तरी तिच्यावर वाईट परिणाम होणारच.' झुंजार म्हणाला.

'मान्य आहे, पण त्यामुळें ती कायमची बदनाम होणार नाहीं. त्याची हकीकत ऐकतांच मला धक्का बसला. त्यावेळीं मला नाटक करण्याची गरजच नव्हती. नंतर मला कल्पना सुचली व मीं डॉक्टर मानकरांना विश्वासांत घेतलें. झुंजार आतां त्याचा मृत्यु अपघाती कसा दाखवायचा हें मी तुझ्या कौशल्यावरच सोपवितों.'

'आबासाहेब, इतकी घाई करूं नका.' झुंजार म्हणाला, 'मीं तुमचें काम पत्करलेलें नाहीं.'

'पण तुला तें केलेंच पाहिजे. आपण दुसरें करणार काय ? कांहीं वर्षांपूर्वी तो फांसावर चढणारच होता. त्याला ठार करण्यांत पाप नाहीं.'

'आबासाहेब, तुम्ही हुषार वकील असल्यामुळें न्यायाची सोयिस्कर व्याख्या तयार करूं शकतां.' झुंजार म्हणाला.

'अरे देवा ! हा माझ्या मुलीच्या आयुष्याचा प्रश्न आहे ! आणि तो सोडविण्यासाठीं त्याला ठार करणें आणि तो रघुवीर तिरंदाज होता हें जगाला कधींहि न समजूं देणें हा एकच उपाय आहे ...'

'तुम्हाला दुसऱ्या कुणाचें नांव सुचलें नाहीं म्हणून तुम्हीं मला बोलाविलेंत.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'मी बदमाष आहें. मला एक लाख रुपये दिले तर मी कुणालाहि म्हणालाहि ठार करीन असें तुम्हांला वाटलें. पण तें बरोबर नाहीं. मला याबद्दल विचार करावयास वेळ हवा.'

'अशक्य ! झुंजार, तूं तावडतोब हालचाल केली पाहिजे.' आबासाहेब म्हणाले, 'झुंजार, त्या माणसानें कांहीं करण नसतांना पूर्वी खून केला होता. आतां तो माझ्या मुलीचा खून करणार नाहीं कशावरून ?'

'हा केवळ तर्क आहे.' झुंजार म्हणाला.

'होय. पण त्या तर्काचा पाया भक्कम आहे.' आबासाहेब म्हणाले, 'जर

आपण वेळ घालविला तर तो वेडा सैतान माझ्या मुलीचें काय करील याची मला भीति वाटते. त्यानें तिच्यावर मोहिनी घातली आहे. मी त्याला पोलिसांच्या स्वाधीन करूं शकेन, पण त्यांत फायदा नाहीं'

'कां ? तसें केल्यानें तुमची मुलगी सुरक्षित राहील आणि तुमचे लाख रुपये वांचतील.'

'झुंजार, त्यामुळें माझा सर्वनाश होईल. मुलगी बदनाम होईल आणि तिचें आयुष्यच निकालांत निघेल. तो सैतान आहे. त्याला ठार करणें न्यायाचेंच ठरेल. त्याचा पत्ता लिहून घे. २६, अंबराई चेंबूर, गणपतीच्या देवळाजवळ, हा त्याचा पत्ता आहे.'

झुंजारनें तो पत्ता मनांत घोकला.

'तूं त्याला कुठेंहि ठार कर, पण तो अपघाती मृत्यु ठरला पाहिजे.' आबासाहेब म्हणाले, 'तूं येथें आलास हें कुणाला माहीत नाहीं आणि तें पुढेंहि कधींच समजणार नाहीं. तूं मान कां हलवितोस ? तूं हें काम नाकारतोस काय ?'

'मी कोणतीहि गोष्ट घाईनें करीत नाहीं.' झुंजार म्हणाला, 'तुम्हीं त्याला एक आठवडाभर दूर ठेवलेंच आहे तुम्ही आणखी कांहीं नाटक चालू ठेवून तुमच्या मुलीला फसवूं शकाल आणि जोंपर्यंत ती तुमच्याजवळ आहे तोंपर्यंत ती सुरक्षित आहे. मी आतां घरीं जाऊन विचार करीन. मी उद्यां टेलिफोन करून माझा निर्णय कळवीन.'

'तुला मी आतां दहा हजार देतों, कामगिरी यशस्वी झाल्यानंतर बाकीचे पैसे मिळतील'

'आबासाहेब, मला तुमचे दहा हजार रुपये नकोत.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'माझ्यासारखा एक सामान्य बदमाष पैसे नाकारतो याचें तुम्हांला आश्चर्यच वाटेल. मीं तुमचें काम पत्करलें आणि तें केलें तरच पैसे घेईन. नमस्ते !'

झुंजार खिडकींतून बाहेर आला आणि कांहीं मिनिटांतच विजयेजवळ पोहोंचला. 'अरे देवा !' ती समाधानानें म्हणाली, 'तुम्हांला भलताच उशीर झाला !'

त्यानें मोटारींत बसून सिगारेट पेटविली आणि त्यानें विचारलें, 'तुझा नवरा भाडोत्री मारेकरी असला तर तुला चालेल काय ?'

## ५ : रक्त ?

विजयेला तें ऐकून धक्काच बसला. 'या तुमच्या बोलण्याचा अर्थ काय ?' तिनें विचारलें, 'काय घडलें ?'

'माझ्या स्वाभिमानाला जोराचा हादरा बसला आहे.' झुंजार म्हणाला,

' मी स्वत:बद्दल कधींच भलती कल्पना करीत नाहीं. पण मला भाडोत्री मारे-करी समजणारा माणूस आहे हें पाहून मला धक्का बसला !'

त्यानें मोटार मुंबईकडे वळविल्यानंतर तिला सर्व माहिती सांगितली. तिनें ती आश्चर्यानें, गंभीर मुद्रेनें ऐकली.

' किती भयंकर !' ती शेवटीं म्हणाली, ' बिचारी ! एका खुनी माणसा बरोबर तिचें लग्न झालें !'

' तुला त्या पोरीबद्दल वाटणारच !' झुंजार म्हणाला, ' पण तुझ्या गरीब बिचाऱ्या नवऱ्याचें काय ?'

' तुम्ही आणि गरीब बिचारे !' ती म्हणाली, ' त्या आबासाहेबांना खात्रीनें वेड लागलें आहे. तुम्ही या घाणेरड्या भानगडींत पडणार नाहीं ना ?'

' मी विचार करीन असें त्यांना सांगितलें. '

' तर मग त्या म्हाताऱ्याप्रमाणें तुम्हांलाहि वेड लागलें आहे. ' विजया म्हणाली.

' मूर्खे, त्यांना टाळण्यासाठीं मीं तसें सांगितलें. ' तो म्हणाला.

' तर मग वेगळें. ' ती समाधानानें म्हणाली, ' पण त्यांनीं तुमच्यावर विश्वास टाकण्यांत भलताच धोका पत्करला नाहीं काय ? तुम्ही हें पोलि-सांना सांगाल अशी त्यांना भीति वाटली नाहीं ?'

' मी असली हकीकत घेऊन पोलिसांकडे गेलों तर काय घडेल याचा तूं विचार केला आहेस काय ?' त्यानें हंसून विचारलें, ' समज, मी आपल्या आनंदरावाकडे गेलों आणि आबासाहेब गरूडांनीं मला पैसे देऊन खून कर-ण्याची कामगिरी माझ्यावर सोंपविली आहे, आपल्या जांवयालाच ठार कर-ण्यास सांगितलें आहे असें म्हणालों तर ते पोट धरून हंसतील किंवा मला समुद्रांत उडी घ्यावयाला सांगतील. आबासाहेब एक नामांकित वकील आहेत. त्यांना सर्व मान देतात. मला कुणीच मान देत नाहीं. '

' कां ? मी तुम्हांला मान देतें. ' ती म्हणाली.

' तुझ्या मताला किंमत नाहीं. तूं माझ्याइतकीच वाईट आहेस. तुझ्या माझ्या शब्दांवर कुणीहि विश्वास ठेवणार नाहीं. म्हणून तर त्या म्हाताऱ्या कोल्ह्यानें माझी अगदीं खाजगी गांठ घेतली. वेळ आली तर तो बुढ्ढा सरळ कानावर हात ठेवील. '

' तें बरोबर आहे. पण मला त्याच्याबद्दल सहानुभूतीच वाटते. आपल्या मुलीचा रघुवीर तिरंदाजाबरोबर विवाह झाला हें समजतांच त्याला भयंकर धक्का बसला असणार. ' ती म्हणाली, ' तो खून करण्याचा प्रश्न बाजूला ठेवून आपण कांहीं करूं शकणार नाहीं काय ?'

' काय करायचें तें सांग. ' झुंजार म्हणाला.

'जर आबासाहेब म्हणतात तितका तो माणूस वाईट असला तर त्याला कांहीं वर्षांपूर्वीच फांसावर चढवायला हवें होतें.' ती म्हणाली, 'मोठेंच गुंतागुंतीचें कोडें आहे.'

'आणि एक लक्ष रुपये हीहि कांहीं लहान रक्कम नाहीं.' तो तिच्याकडे तिरक्या नजरेनें पहात म्हणाला.

'तुम्ही मला फसवूं नका.' ती म्हणाली, 'तुम्हांला कुणीं कुबेराचें भांडार दिलें तरी तुम्ही तसली वाईट गोष्ट करणार नाहीं. पण फोटोवरून तो शरद फार सज्जन दिसतो. आबासाहेबांची कांहीं चूक तर झाली नसेल ? ते अर्धे आंधळेच आहेत---'

'त्यांची चूक झाली असावी असें मला वाटलें नाहीं आणि त्यांना जें वाटतें तेंहि बरोबर आहे. पण ते मला भाड्यानें घेऊ शकणार नाहींत.' झुंजार म्हणाला, 'त्यांनीं हवा तर स्वतःच तो खून करावा.'

'पण त्यांची कांहीं चूक होत असावी असें अद्याप मला वाटतें.' विजया म्हणाली, 'त्यांना बरोबर दिसत नाहीं ...'

'पण त्यांच्याजवळ एक प्रचंड सूक्ष्मदर्शक कांच आहे.' झुंजार म्हणाला, 'शिवाय कमी दिसतें याचा अर्थ ते आंधळे आहेत असा नाहीं...त्यांनीं तिरंदाजाला बरोबर ओळखलें यांत शंकाच नाहीं.'

'तर मग त्यांना ती गोष्ट आधींच समजायला हवी होती.'

'आज दुपारपर्यंत शरद कधींच त्यांच्या अगदीं जवळ गेला नव्हता. आज त्यानें हेतुपूर्वक स्वतःचें खरें स्वरूप प्रकट केलें. आपणच रघुवीर तिरंदाज आहोंत असें त्यानेंच आबासाहेबांना सांगितलें. पण कां ? असला गाढवपणा त्यानें कां करावा ?'

'तें त्याला जुळून दिसतें.' ती अंगावर शहारे देत म्हणाली, 'कुणीहि शहाण्या माणसानें तसें केलें नसतें.'

'कबूल !' त्यानें नुकतेंच एका सुंदर तरुणीबरोबर लग्न केलें. दहा वर्षें तो वेगळें नांव धारण करून चांगल्या प्रकारें जगत आहे. त्याचे आई-बाप जिवंत नाहींत आणि त्याला कुणी नातेवाईक असावेत असें दिसत नाहीं. त्याची एकंदर परिस्थिति चांगली आहे. असें असतांना त्यानें ऐन मधुचंद्रासाठीं प्रयाण करण्याच्या वेळीं मी रघुवीर तिरंदाज आहें असें स्वतःच कां जाहीर करावें ?'

'तो वेडा आहे म्हणून.' ती म्हणाली.

'तो वेडा असेल किंवा आपणांला माहीत नाहीं अशी या प्रकरणाची दुसरी बाजू असेल.' झुंजार म्हणाला, 'आपण फक्त आबासाहेबांची बाजू ऐकली आहे. पण मला त्या शरदचीहि बाजू ऐकावयाची आहे. त्यानें अचानक रंगाचा बेरंग कां करावा हें समजलें पाहिजे. जर तो वेडा नसला तर

त्यानें तसें केलें याचें कांहीं कारण असलें पाहिजे.'

'तुम्ही माझें ऐका आणि यांत पडूं नका.' विजया मनःपूर्वक म्हणाली, 'तुम्ही एक दोन दिवस थांबा व आपणांला कांहीं तांतडीच्या कामासाठीं बाहेरगांवीं जावें लागणार आहे असें आबासाहेबांना कळवा. कां तें समजत नाहीं, पण हें प्रकरण फार भयंकर आहे असें माझें मन मला सुचवीत आहे.'

ते आतांपर्यंत मुंबईला पोहोंचलेच होते. थोड्याच वेळांत ते झुंजार-महालांत दाखल झाले. त्यावेळीं साडेबारा वाजले होते.

'मला वाटतें, शरदबरोबर चार गोष्टी करावयास हरकत नाहीं.' झुंजार टेलिफोन-डिरेक्टरी उचलीत म्हणाला.

'तुम्ही त्याला यावेळीं टेलिफोन करणार कीं काय ?' तिनें विचारलें.

'काय हरकत आहे ?' झुंजार डिरेक्टरीचीं पानें चाळीत म्हणाला, 'हा पहा त्याचा नंबरहि सांपडला.' त्यानें नंबर फिरविला—'कोण ? शरद-कुमार ? छान !'

'पण कोण बोलत आहे ?' रिसीव्हरमधून प्रश्न ऐकूं आला. 'माफ करा, मला आतां तुमच्याशीं बोलायचें नाहीं. तुम्ही खात्रीनें भलताच नंबर फिरविला आहे.'

'तुमचें नांव जर शरदकुमार हजरनवीस असलें तर माझी चूक झालेली नाहीं. माझें नांव आहे झुंजार. मी ताबडतोब तेथें येऊन तुमची भेट घेऊं शकेन काय ? ही मागणी अगदीं चमत्कारिक आहे हें मला मान्य आहे.'

'काय नांव म्हणालांत—झुंजार ?'

'होय, तें माझेंच नांव आहे.'

'म्हणजे तुम्ही मरीन ड्राइव्हवर झुंजार-महालांत रहाणारे झुंजार काय ?'

'होय, अगदीं बरोबर.'

'झुंजारराव, तुम्हांला माझी भेट घेण्याची कां इच्छा व्हावी तें समजत नाहीं.' थकलेला, निर्जीव आवाज ऐकूं आला, 'मी घरांत एकटाच आहें. नोकरांना मीं संध्याकाळीच बाहेर पाठविलें आहे. मला प्रथम वाटलें कीं तुम्ही वार्ताहर असाल. त्या पाजी माणसांनीं मला असा कांहीं त्रास दिला आहे ...'

'शरदकुमार, मी रिपोर्टर नाहीं, पण मला तुमच्याशीं तसेंच कांहीं बोला-यचें आहे.' झुंजार म्हणाला.

'या अशा वेळीं ? पण तुमची इच्छा असली तर या. मी येथेंच असणार.' त्याला उत्तर मिळालें आणि रिसीव्हर खालीं ठेवण्याचा आवाज ऐकूं आला.

झुंजारनें कपाळावर आंठ्या चढविल्या. 'ही गंमत आहे !' तो म्हणाला, 'त्यानें खुशाल रिसीव्हर खालीं ठेवला. काय काम आहे हेंहि विचा-रलें नाहीं.'

'पण त्यानें तुमचें नांव विचारलें ना ?' विजया म्हणाली.

'होय. पण तीच तर गंमत आहे. त्याचा आवाजसुद्धां...'

'त्याच्या आवाजाचें काय ?' विजयेनें विचारलें.

'तो सुरुवातीला बोलला तेव्हां एखादा माणूस खूप धांवल्यामुळें दमला असावा किंवा उत्तेजित झाला असावा असा त्याचा आवाज होता. पण जेव्हां मीं नांव सांगितलें तेव्हां तो अगदीं थकलेला दिसला. असा फरक कां ?'

'मला वाटतें, घरीं गेल्यापासून तो दारू पीत असावा.' ती म्हणाली.

'तें बरोबर आहे. आणि तसें असल्यास मी तरी त्याला दोष देणार नाहीं.' झुंजार म्हणाला, 'पण त्यावरून तो बुद्धिमान आणि सरळ दिसतो. विजू, तूं आतां झोंप. सकाळीं सर्व खुलासा होईलच.'

'अस्सें !' ती त्याच्याकडे रोखून पहात म्हणाली, 'रावसाहेब, आपण जर आज रात्रीं शरदला भेटायला जाणार असला तर मीहि येणार आहें. मला कांहींच कुतूहल वाटत नाहीं आणि मी शांत झोंप घेईन असें तुम्हांला कां वाटावें ?'

'नाहीं ग, तूं बरोबर यावेंस म्हणूनच मी मुद्दाम असें म्हणालों.' झुंजार हंसून म्हणाला, 'तूं स्त्री असल्यामुळें तुला माझ्यापेक्षां शतपटीनें अधिक कुतूहल वाटत असणार.'

पुन्हां ती जोडी बाहेर पडली आणि एक वाजण्याच्या आंत शरदच्या चेंबूर येथील घराजवळ पोहोंचली.

'या खेपेला मला जास्त वेळ लागणार नाहीं.' झुंजार मोटारींतून खालीं उतरतांना म्हणाला.

'या खेपेला मी बरोबरच येणार आहें.' विजया दुसऱ्या बाजूनें खालीं उडी घेत म्हणाली, 'तो खरोखरच खुनी असला—'

'तर तूं माझें संरक्षण करणार आहेस कीं काय ?' त्यानें चेष्टेनें विचारलें.

'अनेकदां केलें आहे.' तिनें सत्य सांगून त्याचें तोंड बंद केलें.

त्यानें पुढें होऊन दारावरील घंटी वाजविली पण उत्तर मिळालें नाहीं. झुंजारनें कपाळावर आंठ्या चढविल्या आणि दार ढकललें. त्याबरोबर तें उघडलें गेलें. तो विजयेसह आंत गेला.

'कुणी घरांत आहे काय ?' झुंजारनें मोठ्यानें विचारलें, पण शांतता कायम राहिली. 'मला हें आवडत नाहीं.' झुंजार पुढें म्हणाला, 'तो पहा डावीकडच्या खोलींत दिवा आहे.'

'पण दार अर्धवटच उघडें आहे.' विजया म्हणाली, 'पुढलें दार उघडेंच होतें. सांभाळा ! हा सांपळाहि असेल...'

झुंजार पुढें झाला आणि त्यानें तें डावीकडचें दार सताड उघडलें. तेथें

सांपळा नव्हता. कांहींच नव्हतें ! ती बैठकीच्या खोलीप्रमाणें सजविलेली आरामशीर जागा रिकामी होती. तेथेंच टेलिफोन होता.

'मीं टेलिफोन केला तेव्हां तो येथेंच होता.' झुंजार म्हणाला, 'बहुधा पत्र टाकण्यासाठीं तो बाहेर गेला असावा. त्यामुळेंच पुढलें दार उघडें होतें. आपण आणखीं शोध करूं या.'

त्यांनीं तळमजल्यावरील इतर दोन खोल्या व स्वयंपाकघर पाहिलें. त्या सर्व चांगल्या प्रकारें सजविलेल्या होत्या आणि तेथें राहणाऱ्याची उच्च अभिरुचि स्पष्ट करणाऱ्या होत्या.

कुणाहि नववधूला अभिमान वाटावा अशा प्रकारें शरदनें आपलें घर शृंगारलें होतें...

'आतां काय ?' बुचकळ्यांत पडलेल्या विजयेनें विचारलें.

'मलाहि तें समजत नाहीं.' झुंजार म्हणाला, 'तो परत येईपर्यंत आपण येथेंच थांबावें कीं वरच्या मजल्यावरून एक चक्कर मारावी ?'

'तुम्ही तसें म्हणाल अशी मला भीति वाटतच होती.' ती म्हणाली.

'म्हणजे वरच्या मजल्यावर कांहीं विशेष पहावयास मिळेल असें तुला वाटतें की काय ?' झुंजार म्हणाला, 'तर मग वरच्या मजल्यावर गेलेंच पाहिजे.'

जिन्यावर सुंदर गलिचा होता. वर मंद प्रकाशाचा दिवा जळत होता आणि एक दोन अर्धवट उघडीं दारें दिसत होतीं. झुंजारनें पहिल्या खोलीत प्रवेश केला आणि तेथला दिवा लावला. ती प्रशस्त, उत्कृष्ट प्रकारें सजविलेली झोंपण्याची खोली होती. तेथल्या जमिनीवरील गालिचा मौल्यवान होता. पण तेथें कसलीहि उलथापालथ झालेली दिसत नव्हती.

'अहो, आपण येथून बाहेर पडलें पाहिजे.' विजया हळूच म्हणाली, 'मला भीति वाटते. या ठिकाणीं येण्याचा आपणांला कांहींच हक्क नाहीं. तो कोणत्याहि क्षणीं परत येईल आणि आपणांला पाहिल्यानंतर...'

'तें पलीकडचें दार बाथरूमचें असणार.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'मी तुला पैजेनें सांगतों कीं, ती जागाहि प्रेक्षणीय असणार. शरदनें या घरासाठीं भलताच खर्च केला आहे.'

तो त्या पलीकडच्या अर्धवट उघडया दाराकडे गेला. त्यानें तें उघडलें आणि आंतला दिवा लावला. खरोखरच ती जागा झुंजारच्या तर्काप्रमाणें उत्कृष्ट होती.

'विजू, इथेंहि कांहीं नाहीं.' झुंजार म्हणाला. 'निदान...'

तो थांबला त्याला तेथल्या शुभ्र फरसबंदीवर कांहीं लालरंगाचे डाग दिसले होते. तो हात धुण्याच्या पात्राजवळ गेला आणि खालीं वांकला. त्याबरोबर तो दचकला.

तें पात्र पाण्यानें भरलें होतें... आणि तें पाणी रक्ताप्रमाणें लाल होतें !

## ६: झुंजारला कांपरें भरलें !

'तें काय ?' विजयेनें लागलीच विचारलें, 'रक्त ?'

'ही लाल शाई किंवा सरबत असण्याचा संभव फार कमी आहे.' झुंजार गंभीर स्वरांत म्हणाला, 'आजूबाजूवर उडालेले शितोडे पहा. कुणीतरी–बहुधा भाई शरदनें अगदीं अलीकडेच हात–पाय तोंड धुतलें असावें. आणि तो चांगलाच बरबटला असावा. विजू, मला वाटतें आतां आपण उरलेल्या जागेवरूनहि नजर फिरविली पाहिजे.'

'नको ! आपण येथून बाहेर पडूं ! आतांच !'

'थांब, अशी घाबरू नकोस.' तो म्हणाला, 'या रक्ताचें अगदीं साधें स्पष्टीकरणहि असूं शकेल.'

ती घाबरली होती. पण झुंजारनें आपला हट्ट सोडला नाहीं. त्यानें त्या मजल्यावरील पाहुण्यांची खोली, शय्यागृह आणि वरच्या मजल्यावरील नोकरांच्या खोल्या पाहिल्या.

'पाहिलेंस मूर्ख ? कुठेंहि प्रेतें पडलेलीं नाहींत.' तो म्हणाला, 'तो शरद खूप दारू प्याला होता. कुठेंतरी आदळल्यामुळें त्याचें नाक खूप दुखावलें व त्यामुळें तो रक्तस्राव झाला. नंतर तो जरा मोकळ्या हवेंत भटकण्यासाठीं बाहेर पडला असणार. हें अगदीं सोपें आहे.'

ते पुन्हा तळमजल्यावरील बैठकीच्या खोलींत गेले आणि विजयेला टेलिफोनजवळील छोट्या पॅडवर एक पत्ता लिहिलेला दिसला 'शिवसदन, रुईया कॉलेजशेजारीं. माटुंगा.'

'यासाठीं सर्वांवरून नजर फिरवावी लागते.' झुंजार म्हणाला, 'हें या पॅडवर कित्येक दिवसांपूर्वीं लिहिलें असेल किंवा मीं टेलिफोन केल्यानंतर कुणीं तरी टेलिफोन करून शरदला या पत्त्यावर बोलाविलें असेल. पण हा पत्ता झिंगलेल्या माणसानें लिहिलेला नाहीं. तें जरा चमत्कारिक वाटतें.'

ते बाहेर पडले. झुंजारनें पुढलें दार पूर्वींप्रमाणेंच अर्धवट उघडेंच राहूं दिलें. ते मोटारींत बसल्यानंतर विजया म्हणाली, 'मला विचाराल तर सर्वच प्रकार चमत्कारिक आहे. आतां आपण सरळ घरीं जाऊं या आणि आपण शरद आणि आबासाहेब यांना अजिबात विसरूं या.'

'ही सूचना अत्यंत शहाणपणाची आहे.' झुंजार मोटार सुरू करतांना म्हणाला.

पण मोटार माटुंग्याला पोहोंचल्यानंतर भलतीकडे वळलेली पाहून ती म्हणाली, 'आतां तुम्ही इकडे कुठें चाललांत ?'

'आतां या बाजूला आलोंच आहोंत तर ती शिवसदनमधील सहा नंबरची

जागा पहावयास काय हरकत आहे ?' निष्काळजीपणें झुंजार म्हणाला, ' कदाचित त्या ठिकाणीं कुणी आनंदी मोरेसारखी तरुणी रहात असेल...'

'तुमचें मन इतकें घाणेरडें असेल अशी मला कल्पना नव्हती.' ती रागानें म्हणाली.

झुंजार हंसून म्हणाला, ' ठीक आहे. मी ते शब्द मागें घेतों.'

त्यानें मोटार शिवसदनजवळ नेली आणि त्याच वेळीं एक छोटी वेगवान मोटार तेथून दूर होतांना दिसली. ' अरेच्चा ! त्या मोटारींत शरद तर नसेल ?' झुंजार वैतागानें म्हणाला, ' तसें असेल तर अगदीं थोडक्यांत त्याची–आपली चुकामूक झाली असें म्हणावें लागेल.'

'पण तुम्ही या ठिकाणीं करणार काय ?' विजयेनें हरकत घेतली– ' तुम्हांला इतकी लुडबुड करण्याचें कारण काय ?'

' माझ्या आयुष्यांत ज्या कांहीं सर्वोत्कृष्ट गंमती घडल्या आहेत त्याचे कारण माझा चौकस स्वभाव हेंच होतें.' झुंजार म्हणाला, ' मी एका मिनिटांत परत येतों. मी फक्त त्या जागेवरून नजर फिरविणार आहें.'

ती कांहीं बोलण्यापूर्वींच तो तिच्यापासून दूर झाला. शिवसदन ही बैठीच इमारत होती व सहा नंबरची जागा समोरच होती. समोरचें दार अर्धवट उघडें पाहून झुंजार चरकला. शरदच्या घरांतील सर्व दारेंहि अशींच अर्धवट उघडीं होतीं. या अर्धवट उघडया दारांतून दिव्याचा प्रकाश बाहेर पडत होता.

त्यानें तें दार हळूच ढकललें आणि आंत प्रवेश केला. जागा व्यवस्थित दिसत होती. ' कुणी घरांत आहे काय ?' असें त्यानें मोठयानें विचारलें पण आपणांला उत्तर मिळणार नाहीं हें जणूं काय त्याला माहीत होतें. तें घर कुणातरी उनाड मैनेचें नव्हतें. कुणी तरी सुसंस्कृत व्यक्ति त्या ठिकाणीं आरामानें रहात असावी.

पलीकडे एक अर्धवट उघडें दार दिसत होतें. झुंजारनें तें दार अधिक उघडण्याचा प्रयत्न केला-पण तें कशाला तरी अडत होतें. त्यानें तेथूनच आंत डोकावलें व आतांपर्यंत त्यानें अनेक चमत्कारिक प्रसंग अनुभवले होते तरी त्याला आयुष्यांत प्रथमच आपल्या शरीरांतील सर्व रक्त गारठलें असें वाटलें !

' अरे देवा !' तो घोगऱ्या स्वरांत म्हणाला.

दार कशाला अडत होतें तें त्याला दिसलें होतें. आंत एक तरुणी पडली होती. तिची मान भयानक प्रकारें कापली होती आणि खालचा गालिचा रक्तानें बरबटला होता. तेवढयानेंच झालें नव्हतें तर तिची छाती चिरून हृदय बाहेर काढण्यांत आलें होतें व त्याचे तुकडे केले होते. भयानक सैतानी राक्षसी काम होतें तें !

एकाच गोष्टीबद्दल झुंजारला थोडें समाधान वाटलें होतें. त्या तरुणीच्या चर्येवर आश्चर्याची छटा होती. एरव्हीं चेहरा शांत आणि सौम्य होता. निदान मृत्यूच्या वेळीं तरी ती घाबरली नव्हती. त्या पूर्वींच तिला ठार करण्यांत आलें होतें. झुंजारला कांपरें भरलें होतें.

'सैतान! महानीच सैतान!' झुंजार त्वेषानें म्हणाला.

तो कांहीं करूं शकत नव्हता. तेथें थांबणें निरर्थक होतें इतकेंच नव्हे, तर धोक्याचें होतें. त्यानें रुमालानें दाराची मुठ साफ केली. न जाणो, चुकून हात लागला असला तर? त्यानें बाहेरचें दारहि तसेंच पुसलें आणि तो आपल्या मोटारीजवळ आला.' मेहनत फुकट गेली असणार?' ती हंसून म्हणाली, 'स्वारीचा चेहराच सांगतो.'

तो बोलला नाहीं. त्यानें मोटार सुरू केली आणि त्याचा चेहरा पहातांच तिचें हास्य नाहींसें झालें. कांहीतरी बिघडलें आहे हें तिनें ओळखलें.

'काय झालें?' तिनें चिंतायुक्त स्वरांत विचारलें, 'तुम्ही बोलत कां नाहीं?'

'एक मिनिटभर थांब!' तो पुटपुटला.

मोटार वळवतांना रस्त्यावरील दिव्याचा प्रकाश त्याच्यावर पडला आणि त्याचा भकास दिसणारा चेहरा पाहून तिला धक्काच बसला. त्याच्या कपाळावरून घामाच्या धारा वहात होत्या. ती घाबरली. विजयेनें त्याला अशा अवस्थेंत पूर्वीं कधींच पाहिलें नव्हतें. तीहि आतां इतकी बावरली होती कीं तो मोटार कोणत्या दिशेकडे वळवीत आहे हें तिच्या लक्षांत आलें नव्हतें.

त्यानें एका ओसाड जागीं मोटार थांबवून सिगारेट पेटविली. नंतर तो म्हणाला, 'क्षमा कर विजू, मला असा कधींच धक्का बसला नव्हता. अगदीं हुबेहूब तसाच प्रकार! त्यामुळें तर तो मला भयंकर वाटला.'

'तुम्ही हें काय बोलत आहां? तुम्ही तें अगदीं सावकाश सांगा. माझी मुळींच घाई नाहीं—'

'मी त्या जागेंत गेलों.' तो मध्येंच म्हणाला, 'शरदप्रमाणेंच त्या जागेचें दार अर्धवट उघडें होतें आणि आंत एका तरुणीचें प्रेत पडलें होतें. तिची मान चिरली होती इतकेंच नव्हे तर हृदय बाहेर काढून त्याचे तुकडे करण्यांत आले होतें!'

'अग आई ग!' अंगावर शहारे देत विजया म्हणाली.

'आणि बारा वर्षांपूर्वीं रघुवीर तिरंदाजनें आनंदी मोरे नांवाच्या तरुणीचा अगदीं असाच खून केला होता!' झुंजार म्हणाला, 'त्यामुळेंच त्याला फांशीची शिक्षा देण्यांत आली होती, पण त्याला वेड लागलें यामुळें...'

'तें—तें—मला माहीत आहे.' ती मध्येंच म्हणाली. तिची आणखीं ऐकण्याची

इच्छा नव्हती.

'आपण आलों तेव्हां जी मोटार जातांना दिसली ती कदाचित त्या शरद-चीहि असेल.' तो म्हणाला.

'तुमचें म्हणणें बरोबर दिसत नाहीं.' ती म्हणाली, 'त्याच्या घरांतल्या रक्ताचें काय ? त्यानें तिला एका तासापूर्वी ठार केलें असावें. त्यानें घरीं जाऊन हात धुतले व नंतर तो पुन्हां कुठेंतरी दुसरीकडे गेला असावा.'

'या तुझ्या म्हणण्यांत कांहीं अर्थ आहे.' झुंजार विचार करीत म्हणाला, 'पण मग त्या मोटारींत कोण होतें ?'

'तेथें अनेक माणसें रहातात. कुणीतरी कांहीं कामासाठीं मोटार बाहेर काढली असेल.' तिनें उत्तर दिलें—'आपण आतां घरीं जाऊं या. तुम्हीं पोलि-सांना तें कळविण्याचा तर विचार करीत नाहीं ना ? तुम्ही तसल्या भानग-डींत पडू नका. नेहमींप्रमाणें पोलिसांना तुमचाच संशय यायचा.'

'अग पण, तुझ्या जिभेला हाड आहे कीं नाहीं ? मी एका तरुणीचा एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत गळा चिरणारा माणूस आहें काय ? हा तिरंदाजानें केलेला खून आहे हें पोलीस पहातांक्षणींच ओळखतील. त्या ठिकाणीं त्यांना त्याच्या बोटांचे ठसेहि सांपडतील असा माझा अंदाज आहे. मी आतां त्या माणसाला गांठणार आहें आणि पोलिसांच्या स्वाधीन कर-णार आहें. त्यामुळें आनंदराव खूषहि होतील.'

'नाहीं ! तसलें कांहीं करूं नका !' ती घाबरून म्हणाली, 'तो घातकी वेडा कदाचित् तुमच्यावर हल्ला करील...'

'आणि तेवढ्यासाठीं मीं त्याला टाळायचें ?' झुंजारनें रागानें विचारलें, 'विजू, जर तूं तें भयानक दृश्य पाहिलें असतेंस तर स्वतःच त्याची मान आंवळण्यास तयार झाली असतीस. विजू, मी त्याला गांठणारच !'

ती गप्प बसली. प्रत्यक्ष ब्रह्मदेवहि त्याला त्या निश्चयापासून परावृत्त करूं शकणार नाहीं हें तिला माहीत होतें.

'माझी खात्री आहे कीं, तो आतां त्याच्या घरीं परतला असणार !' झुंजार पुढें म्हणाला, 'आपण आतां तिकडेच जाणार आहोंत आणि तो असला तर त्याला गांठणार आहोंत. आणि मी त्याला सरळ जवळच्या पोलीस ठाण्यावर नेणार आहें. त्याच्यासारख्या माणसाला मोकळा सोडणें ही भया-नक गोष्ट आहे.'

'त्या बिचाऱ्या विलासिनीला किती धक्का बसेल !' विजया म्हणाली.

'त्या शिवसदनमध्यें रहाणाऱ्या मुलीला धक्का बसला तितका बसणार नाहीं.' झुंजार गंभीर स्वरांत म्हणाला, 'त्या विलासिनीनें स्वतःला सुदैवी समजलें पाहिजे. जर त्या म्हाताऱ्यानें तें झटक्याचें नाटक केलें नसतें तर तिचीहि मान चिरण्यांत आली असती.'

त्यानें पुन्हां मोटार सुरू केल्यानंतर विजया म्हणाली, 'तुम्हांला एक गोष्ट विलक्षण वाटत नाहीं काय ? शरदनें आपल्या विवाहाच्या रात्रींच असली गोष्ट करावी ? बारा वर्षांपूर्वी त्यानें आनंदी मोरेचा खून केला होता. त्या-नंतर दहा वर्षं वेगळें नांव धारण करून त्यानें फार चांगल्याप्रकारें आयुष्य घालविलें होतें. तो फार मोठ्या पदाला पोहोंचला होता.'

'तें तुला कसें समजलें ?' झुंजार म्हणाला.

'म्हणजे ? तुम्हींच तर तें मला सांगितलें...'

'तो आपलें आयुष्य चांगल्याप्रकारें घालवीत होता कशावरून ?' झुंजार म्हणाला, 'बाह्यतः तो तसें दर्शवीत असेल. असले खुनी कमालीचे धूर्त असतात.'

'ठीक. तें जाऊं द्या. पण आतां तो घरीं असला तर काय ?' विजया म्हणाली, 'तुम्हीं फार सावध असलें पाहिजे त्याच्याजवळ तो सुरा असला..'

'होय, चांगली सूचना केलीस !' झुंजार म्हणाला, 'सुरा त्या तरुणी-जवळ पडला नव्हता. तो त्याच्याजवळच असला पाहिजे.'

ते चेंबूर येथील त्या घराजवळ पोहोंचले तेव्हां तेथलें वातावरण शांत होतें. बाहेरच्या दारावरील दिवा जळत होता आणि वरच्या मजल्यावरीलहि एक खिडकी प्रकाशित दिसत होती.

'तो घरीं तर आहे !' झुंजार म्हणाला, 'आपण वरच्या मजल्यावरील दिवे मालविले होते !'

विजयेनें त्याला सावधगिरीचा इषारा देण्यासाठीं तोंड उघडलें, पण ो विचार बदलला. ते जोडीनेंच पुढच्या दाराजवळ गेले. दार आतां बंद होतें. झुंजारनें दारावरील घंटी वाजविली व त्याबरोबरच तें हातानें ठोठावलें.

ते थांबले—वाट पहात होते. अतिशय सावध होते.

कांहीं शांत क्षण निघून गेले... नंतर दारापलीकडे हालचालीचा आवाज झाला. दार अर्धवट उघडलें गेलें आणि तेवढ्या जागेंत शरद दिसला. तो पायापासून डोक्यांपर्यंत थरथरत होता आणि त्याच्या चेहऱ्यावर शुद्ध प्रेत-कळा पसरली होती !

## ७ : शरदची हकीकत

'बोला !' शरद घोगऱ्या आणि तापलेल्या आवाजांत म्हणाला, 'तुम्हांला काय हवें आहे ?'

'तूं !' पिस्तुलाचा बार व्हावा त्याप्रमाणें झुंजार म्हणाला.

तो धोका पत्करण्यास तयार नव्हता. त्यानें त्वरेनें दार उघडलें. तो शर-दच्या पाठीमागें सरकला आणि त्याचे हात असे पकडले कीं, त्याला यत्किं-चितहि हालचाल करतां येऊं नये. प्रसंग पडल्यास आपल्या पायांचा व नखांचा

उपयोग करण्याच्या तयारीनें विजया उभी होती.

पण शरदला इतकें आश्चर्य वाटलें होतें कीं, त्यानें मुळींच गडबड केली नाहीं. त्याच्यांत लढण्याची ताकदच नव्हती. तो जिवावर उदार झालेल्या खुनशी वेडयाप्रमाणें वागला नाहीं. झुंजारनें त्याला ढकलीत बाजूच्या बैठकीच्या खोलींत नेलें तेव्हां तो धांपा टाकीत होता.

'हें काय आहे ?' त्यानें कसेंबसें विचारलें, 'दरोडा ?'

'भाऊ, इतकें तें सोपें नाहीं.' झुंजार लपविलेल्या शस्त्रासाठीं त्याच्या कपडयांवरून हात फिरवीत म्हणाला, 'रघुवीर तिरंदाज, तुला मीं आतां गांठलें आहे.'

'तुम्हांला तें माहीत आहे ?' शरद घाबरून म्हणाला.

'तूं रघुवीर तिरंदाज आहेस हें मला माहीत आहे.'

'पोलीस ?' त्यानें हलक्या आवाजांत विचारलें.

'त्यांना अद्याप माहीत नाहीं– पण ते लवकर येतील.' झुंजार म्हणाला, 'म्हणजे तूं तरी त्यांच्याकडे जाशील. भयंकर माणसा, त्या शिवसदनमधील तरुणीच्या खुनाबद्दल मी तुला माटुंग्याच्या पोलिसांच्या स्वाधीन करणार आहें.'

'नाहीं ! तें खरें नाहीं !' तो धांपा टाकीत म्हणाला, 'मीं तिचा खून केला नाहीं ! मीं तिला त्या भयंकर अवस्थेंत पाहिलें. अरे देवा ! अगदीं आनंदी मोरेसारखा प्रकार ! मीं तिला तशी पडलेली पाहिली तेव्हां मला वेड लागलें असावें अशी मला शंका आली.'

'तें तुझें तुला माहीत.' झुंजार सूचक स्वरांत म्हणाला.

त्या माणसापासून धोका नसल्यामुळें झुंजारनें त्याला तेथल्या आरामखुर्चीवर बसूं दिलें. तो अगदीं गळून गेला होता, थरथरत होता. त्याची वागणूक झुंजार–विजयेच्या अपेक्षेहून इतकी भिन्न होती कीं, त्याच्याशीं कसें वागावें हेंच त्यांना समजेना.

'हा सांपळा आहे !' तो निराशेनें म्हणाला, 'मी खुलासा करूं शकत नाहीं, पण मला हें सांगूं द्या... नाहीं, पण त्याचा तरी काय उपयोग आहे ? मी रघुवीर आहें हें तुम्हांला माहीत आहे. आणि तुम्ही माझ्या एका शब्दावरहि विश्वास ठेवणार नाहीं. पण तुम्हांला तें कसें समजलें ? कुणीं सांगितलें ?'

'इतक्यांतच नको.' झुंजार म्हणाला, 'पण तुझी इच्छा असली तर बोल.'

'तुम्हीं पोलिसांपैकीं नाहीं तर ?' बराच शांत होऊन शरद म्हणाला, 'तर मग कोण ?'

'माझें नांव आहे झुंजार.'

' असें काय !' तो मान डोलावीत म्हणाला, 'आपण मुंबईचेच काय ?'

' म्हणजे ! नांव ऐकल्यानें तुझ्या कांहींच लक्षांत आलें नाहीं ? मीं साडे-बारा वाजतां तुला टेलिफोन करून येथें येऊं काय म्हणून विचारलें आणि तूं होय म्हणून सांगितलेंस...'

' पण साडेबारा वाजतां मी येथें नव्हतोंच. ' तो मध्येंच म्हणाला, ' मीं बाहेर जातांना घड्याळांत पाहिलें होतें. त्यावेळीं बारा वाजून वीस मिनिटें झालीं होतीं. '

झुंजारची चर्या बदलली. ' पण कुणीं तरी मला जबाब दिला होता. ' तो म्हणाला, ' तुझ्या या घरांत आणखीं कुणी आहे काय ?'

' कुणी नाही. नोकरांना रजा दिली आहे. मी आणि विलास मधुचं-' त्यानें वाक्य अर्धवट सोडलें- ' पण आतां तें संपलेंच. पण तुम्हांला कुणीं जबाब दिला होता ? तें अशक्य आहे. घर अजिबात रिकामें होतें. '

झुंजार आतां अधिकच सावध दिसत होता. एकतर शरदचें घड्याळ चुकत असावें किंवा तो खोटें बोलत असावा. आणखीं प्रश्न विचारण्यानेंच त्यावर प्रकाश पडणार होता.

' तूं बारा वाजून वीस मिनिटांनीं बाहेर गेलास. ' झुंजार म्हणाला, ' तूं त्यावेळीं घर कां सोडलें होतेंस ?'

' कारण मंजुळेचा टेलिफोनवरून संदेश आला होता. त्यावेळीं सव्वाबारा वाजले असणार आणि मी कपडे चढवून लागलीच बाहेर पडलों. '

' हें बघ, ' गरूड-भरारीं ' तून बाहेर पडल्यापासून तूं काय काय केलेंस तें सांग. म्हणजे आम्हांला अधिक स्पष्ट चित्र दिसेल. ' झुंजार म्हणाला.

जर शरदनें उठून विद्युत्‌गतीनें हल्ला चढविला तर त्याचा खरपूस समाचार घेण्याची झुंजारनें तयारी ठेवली होती. अर्थात् तसा संभव दिसत नव्हता. शरद शरीरानें मजबूत होता पण आतां त्याचें अवसान अजिबात गळून गेलें होतें. तो खूप दारू प्यालेला नाहीं हेंहि झुंजारनें पाहिलें होतें. त्यानें त्याचे हात पकडले तेव्हां मुद्दाम त्याच्या तोंडाजवळ नाक नेलें होतें. पण झुंजारला दारूचा वास आला नव्हता.

' माझें आज सकाळींच लग्न झालें. विलासचे वडील अचानक आजारी पडल्यामुळें गडबड उडाली. ' तो आतां सरळ बसून बोलत होता, ' तुम्हीं असला मूर्खपणा कुठें पाहिला-ऐकला आहे काय ? त्या म्हाताऱ्याची प्रकृति थोडी बिघडतांच विलासनें आपल्याबरोबर राहिलें पाहिजे अशी त्यानें तिला शपथ घेण्यास भाग पाडलें. माझी कांहीं किंमतच नाहीं. मला या रिकाम्या घरांत पाठविलें. आमचा मधुचंद्राचा बेत ढांसळला. सर्व तयारी फुकट गेली.'

' तें आम्हांला माहीत आहे. ' झुंजार मध्येंच म्हणाला, ' पण तूं या रिकाम्या घरांत आलास, त्यानंतर काय घडलें ?'

'कांहींच नाहीं. मी येथें आलों. नोकर नसणार हें माहीत असल्यामुळें हॉटेलांत रहावयास जावें असें मनांत आलें होतें, पण त्या अवस्थेंत हॉटेलांत जाणें मला आवडलें नाहीं. कुणीहि जवळ नसावें असें मला वाटत होतें. मी येथें आलों. घरांत जें कांहीं थोडेंसें सांपडलें त्यावर भूक भागविली आणि याच खोलींत बसलों. टेलिफोनची घंटी वाजली तेव्हां मला आश्चर्य वाटलें. मी येथें असणार हें कुणालाहि माहीत नव्हतें आणि सव्वाबारा वाजले होते. मंजुळेनें फोन केला होता.'

'ती तुमची खास मैत्रीण असणार ?' झुंजारनें विचारलें.

'वेडयासारखें बोलूं नका.' तो रागानें म्हणाला, 'मंजुळा ही विलासिनीची मोलकरीण...अरे देवा! विलास तेथें आली आहे व मीं ताबडतोब तेथें यावें असें तिनें सांगितलें आणि मला इतका आनंद झाला ...'

'जरा थांब! शिवसदन ही तुझ्या बायकोची जागा काय ?' झुंजारनें विचारलें.

'होय ती मुंबईंत असली कीं तेथेंच रहात होती.'

'आणि तुझी बायको आली आहे असें सांगून त्या मंजुळेनें तुला तेथें ताबडतोब बोलाविलें ? पण बायको तेथें असतांना मोलकरणीनें टेलिफोन करावा हें तुला चमत्कारिक वाटलें नाहीं ?'

'माझा तोच मूर्खपणा झाला!' तो कपाळावर हात आपटून म्हणाला, 'ती मुंबईंत आली आहे हें समजतांच मी गाढवाप्रमाणें धांवत सुटलों. विलास मुंबईंत आली असती तर सरळ येथें आली असती हें माझ्या लक्षांतच आलें नव्हतें'

झुंजारचा चेहरा उग्र बनला होता. शरदचा तो खुलासा त्याला अगदींच ठिसूळ वाटला होता.

'विलास स्नानगृहांत आहे असें मंजूनें सांगितलें आणि मीं उड्या मारीत बाहेर पडून माझी मोटार बाहेर काढली.'

'कोणत्या जातीची मोटार ?'

'माझी ब्यूक सलून आहे. मीं ती विलाससाठीं बाजारांत खूप वशिला लावून विकत घेतली. मी तेथें पोहोंचलों तेव्हां पुढलें दार उघडें होतें व आंत प्रकाश दिसत होता. मी आंत गेलों, आणि झोंपण्याच्या खोलींत दाराजवळच पडलेली मंजुळा दिसली! अरे देवा!' दोन्ही हातांनीं तोंड झांकून तो कांपऱ्या आवाजांत म्हणाला, 'कुणींतरी तिला कांहीं मिनिटांपूर्वींच ठार केलें होतें. बारा वर्षांपूर्वी आनंदीची अगदीं तशीच अवस्था करण्यांत आली होती आणि त्याच गोष्टीचा मला धक्का बसला.'

तो अचानक उभा राहिला आणि झुंजार–विजयेनें लागलीच आपले पवित्रे बदलले, पण शरदनें हाताच्या मुठी आंवळून फेऱ्या घालण्यास सुरु

घात केली होती.

'अगदीं आनंदी मोरेसारखेंच !' तो घोगऱ्या आवाजांत म्हणाला, 'तसेंच रक्त, तशाच जखमा आणि मंजू पडली होती तीसुद्धां हुबेहूब आनंदी-सारखी ! मी तेथून कसा बाहेर पडलों आणि मोटारींत बसलों तेंहि मला समजलें नाहीं.'

'नीट विचार कर.' झुंजार म्हणाला, 'तूं त्या घरांतील कोणत्या वस्तूला स्पर्श केला होतास काय ? तुझ्या हातांवर किंवा कपडयांवर रक्त लागलें होतें काय ?'

'नाहीं, बारा वर्षांपूर्वीची मला बरोबर आठवण होती.' तो अंगावर शहारे देत म्हणाला, 'निदान तेवढयापुरतें तरी माझें डोकें ठिकाणावर होतें. पण तेवढयानेंच झालें नव्हतें. मी परत आलों तेव्हां माझ्या बाथरूममधील 'बेसिन' रक्तानें माखलेल्या पाण्यानें भरली होती ! ती गोष्ट मला जास्त भयंकर वाटली ! तें रक्त आलें कोठून ?'

विजयेनें आपणांवर नजर रोंखली आहे आणि तिच्या नजरेंत संशययुक्त दयेची छटा दिसत होती याची झुंजारला जाणीव होती. तो म्हणाला, 'शरद, तूं मला विचारांत पाडलें आहेस.'

'तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवणार ना ?' शरदनें आतुरतेनें विचारलें.

'मीं तें ठरविण्यापूर्वीं मला खूप ऐकायचें आहे.' झुंजार म्हणाला, 'उदा-हरणार्थ मला त्या आनंदी मोरेची हकीकत समजली पाहिजे. तूं रघुवीर तिरंदाज आहेस आणि बारा वर्षांपूर्वीं तुला खुनाबद्दल शिक्षा झाली होती, पण वेडयांच्या हॉस्पिटलांत पाठविण्यांत आलें होतें हें तूं नाकबूल करीत नाहींस ना ?'

'तें मला कसें नाकबूल करतां येईल ?' तो पुन्हां खुर्चीवर हताशपणें पडून हलक्या आवाजांत म्हणाला, 'तुम्हांला ती सर्व माहिती दिसते.'

'तूं आतां त्या आनंदीची हकीकत सांग.' झुंजार म्हणाला, 'ती मुलगी कोण होती आणि तूं तिला कां ठार केलेंस ?'

'मीं तिचा खून केला नाहीं !' तो रागानें ओरडून म्हणाला, 'ती भयं-कर चूक होती.. पण तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवणार नाहीं. त्यावेळींहि कुणीं माझ्यावर विश्वास ठेवला नव्हता. सर्वच गुन्हेगार आपण निर्दोष आहोंत असें शपथेवर सांगतात. पण जो निर्दोष असून निर्दोष आहे असें शपथेवर सांगतो त्याचें काय ?'

'तूं ती हकीकत मला सांग.' झुंजार शांतपणें म्हणाला आणि त्याचा चेहरा पाहून शरदलाहि धीर आला असावा.

'मी त्यावेळीं अवघा वीस वर्षांचा तरुण होतों. वैमानिक होण्याची माझी फार इच्छा होती. पण तें काम अतिशय धोक्याचें म्हणून माझ्या वडिलांना

पसंत नव्हतें. मी सांगलीला कॉलेजांत शेवटच्या वर्षांत होतों आणि सुट्टीचे दिवस मुंबईंत घालवावे म्हणून येथें आलों होतों.' शरदनें हकीकत सांगण्यास सुरुवात केली.

'आणि एका हॉटेलांत माझी आणि आनंदीची भेट झाली ती चांगली मुलगी होती. आमची ओळख झाल्यानंतर मी मांडवी येथील तिच्या खोली-वर जाऊं लागलों. कृपा करून तुम्ही कांहीं भलतें मनांत आणूं नका. एकत्र चहा घेणें, गप्पागोष्टी करणें एवढाच आमचा कार्यक्रम असे.

'त्या दिवशीं मी तिच्याकडे गेलों आणि त्याचवेळीं गोदींत एका जहाजावर भयानक स्फोट झाला. आजूबाजूच्या अनेक घरांना आग लागली होती. कित्येक घरें कोंसळलीं होतीं. आनंदीला तेथून बाहेर काढून सुरक्षित ठिकाणीं न्यावी म्हणून मी धांवत त्या इमारतींत गेलों. तिचें दार अर्धवट उघडें होतें आणि ती रक्ताच्या थारोळ्यांत पडली होती. तिची मान कापली होती! मीं तिचा खून केला नाहीं! तो खून मींच केला असें सर्व म्हणत होते, पण तें खरें नव्हतें.'

'पण तुझ्या हातांना आणि कपड्यांना रक्त लागलें होतें.' झुंजार म्हणाला.

'होय, तें दृश्य पाहून मी घाबरलों होतों. तसला प्रकार मी आयुष्यांत प्रथमच पहात होतों. मीं तिला उचलण्याचा प्रयत्न केला तेव्हां माझ्या हातांना आणि कपड्यांना रक्त लागलें. तेव्हां मात्र मी घाबरलों आणि आणि तेथून पळत सुटलों. त्या भागांतील कित्येक घरें जळत होतीं. लोकांची धांवपळ सुरू होती. कुणींच माझ्याकडे लक्ष दिलें नाहीं. मीं एकदांचें माझे हॉटेल गाठलें.

'ती सर्व रात्र मीं खरोखर बसून घालविली होती. माझ्या नजरेसमोरून ती आनंदी हलत नव्हती. मी सारखा विचार करीत होतों. तिला कुणी आणि कां ठार केलें? मी तिच्या जागेंत जाण्यापूर्वींच कुणीतरी तें अघोरी कृत्य केलें होतें. दुसरे दिवशीं म्हणजे पहांटेसच मला माझ्या हॉटेलांतच अटक करण्यांत आली. पोलिसांना रक्तानें माखलेले कपडे सांपडले. मीं हात साफ केले होते पण कपड्यांकडे लक्ष दिलें नव्हतें.'

'पोलिसांना तुझ्या हॉटेलचा पत्ता कसा मिळाला?' झुंजारनें विचारलें

'आनंदीनें शेजारणीजवळ माझ्यासंबंधीं खूप गप्पागोष्टी केल्या होत्या व त्या बाईला मी कुठें उतरलों आहें तें सांगितलें होतें. आनंदी एक–दोन वेळा माझ्या हॉटेलांत आली होती. ती एका स्टोरसमध्यें सेल्समनचें काम करीत होती. ती फार हुषार होती. नाटकांत किंवा चित्रपटांत काम करण्याची तिची इच्छा होती.'

'तिचे कुणी पुरुष आणि नाटकी मित्र होते काय?'

'निदान तिनें मला तरी कांहीं सांगितलें नव्हतें आणि मींहि कधीं फारशी चौकशी केली नव्हती. मला त्या इमारतींतून बाहेर पडतांना पहाणारे कित्येक साक्षीदार पुढें आले. त्यावेळीं माझा चेहरा भयंकर दिसत होता असें त्यांनीं सांगितलें. पण तुम्हीच सांगा, तसलें दृश्य पाहिल्यानंतर कुणाचा चेहरा भयंकर दिसणार नाहीं?'

झुंजारला माणसांची परीक्षा होती. त्याला शरद आवडूं लागला होता. तो सत्यच सांगत होता अशी झुंजारची खात्री पटली होती.

'मला कांहीं बचावच करतां आला नाहीं.' शरद कांहीं वेळानें पुढें म्हणाला, 'आबासाहेबांनीं-त्या लबाड सैतानानें तर ज्युरीला असें सुचविलें कीं मीं आनंदीवर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला व तिनें नकार दिल्यामुळें तिचा खून केला. आबासाहेबांची वागणूक पूर्वग्रहदूषित आणि खुनशी होती...'

'पण कां? ते सरकारी वकील या नात्यानें आपलें काम करीत होते.'

'नाहीं. मी घातकी खुनी आहें असें त्यांनीं ठरवूनच टाकलें होतें.'

'ठीक, पण तुझ्या वकिलानें काय केलें?' झुंजारनें विचारलें.

'तोहि मला अपराधीच समजत होता.' खिन्न स्वरांत शरद म्हणाला, 'मीं वेड्याचें सोंग घेतलें तरच मानेचा फांस चुकेल असें त्यानें सांगितलें. त्यानें तशी ज्युरीचा खात्री पटविली आणि मी अपराधी आहें पण वेडा आहें, असा निर्णय देण्यांत आला.

'मीं दोन वर्षें वेड्यांच्या हॉस्पिटलांत घालविलीं.' दीर्घ निःश्वास सोडून शरद म्हणाला, 'त्या धक्क्यानें माझे वडील वारले. आईनें अंथरूण धरलें होतें. ती पुन्हां उठलीच नाहीं. आणि मी एके दिवशीं हॉस्पिटलांतून फरारी झालों आणि नांव बदलून वैमानिक खात्यांत नोकरी मिळविली.'

'तूं कसा फरारी झालास आणि कशी नोकरी मिळविलीस ती सविस्तर हकीकत मला नको' झुंजार त्याला सिगारेट देत म्हणाला, 'पण लग्न झाल्याबरोबर आपण खरे कोण हें तूंच आबासाहेबांना सांगितलेंस काय?'

'होय, पण तें तुम्हाला कसें समजलें?'

'त्यांनींच आज रात्रीं तें मला सांगितलें.'

'म्हणजे तुम्ही आबासाहेबांचे मित्र आहां कीं काय?' त्यानें झुंजारकडे संशयानें पहात विचारलें.

'नाहीं. आज रात्रीपर्यंत मी कधींच त्यांच्याबरोबर बोललों नव्हतों. पण तूं तुझी हकीकत पुढें सांग.' झुंजार म्हणाला, 'तूं म्हणतोस कीं आनंदीचा खून तूं केला नाहींस. त्यानंतर दहा वर्षें वैमानिक म्हणून तूं चांगली कीर्ति मिळविलीस. जो वकील तुझ्याविरुद्ध लढला त्याचीच सुंदर मुलगी पळविलीस.

तर मग लग्न झाल्याबरोबरच आपण कोण हें तूं आबासाहेबांना कां सांगितलेंस ?'

'मला माहीत नाहीं !' शरद म्हणाला.

'तुला माहीत नाहीं ?' आश्चर्यानें व संशयानें झुंजारनें विचारलें.

'होय, मी तुम्हांला सत्यच सांगतों.' शरद घोगऱ्या स्वरांत म्हणाला, 'मीं कां सांगितलें तें मलाच समजत नाहीं. माझा भलताच मूर्खपणा झाला...'

'शरद, मी तुला एका गोष्टीची आठवण देतों.' झुंजार म्हणाला, 'शिक्षा झाल्यानंतर तुला कोर्टांतून बाहेर नेतेवेळीं तूं आबासाहेबांना सूड घेण्याची धमकी दिली होतीस कीं नाहीं ?'

'होय, दिली होती. पण त्यावेळीं मी काय बोलत होतों तें माझें मलाच समजत नव्हतें.'

'पण तूं त्यांच्या मुलीशीं लग्न करून त्यांचा सूडच उगविला नाहींस काय ? आणि तूं तसें अभिमानानें त्यांना सांगितलेंहि.'

'नाहीं. तुमची चूक होत आहे...'

'तूं त्यांना तसें म्हणालास असें ते म्हणतात.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'निदान तुम्हां दोघांपैकीं कुणीतरी खोटें बोलत असावें. तूं केवळ सूड घेण्यासाठीच त्यांच्या मुलीशीं लग्न केलेंस ! ही अत्यंत नीच गोष्ट आहे. त्यामुळें मला तुझ्याबद्दल वाटणारी सहानुभूति नष्ट होऊन मला तुझा तिरस्कार वाटतो !'

'जरा थांबा !' धांपा टाकीत शरद म्हणाला, 'तुम्ही चूक करीत आहां. माझें तिच्यावर अतिशय प्रेम आहे.'

'जर तुझें तिच्यावर खरोखरच प्रेम आहे तर लग्नाच्या दिवशींच तिच्या बापाला मुद्दाम जुनी माहिती देऊन तूं तिच्या सुखाचा चुराडा कां केलास ?'

'मला तसें वाटलें नव्हतें—खरोखरच वाटलें नव्हतें !' शरद ओरडूनच म्हणाला, 'माझा तो खरोखरच मूर्खपणा झाला. अठरा महिन्यांपूर्वीं विलासची आणि माझी ओळख झाली. तेव्हां ती कुणाची मुलगी आहे हेंहि मला माहीत नव्हतें. नंतर ती आबासाहेबांची मुलगी आहे असें समजलें तेव्हां मी घाबरलों.

'पण पुढें आमची अधिकच मैत्री जमली. ती मुंबईंतच रहात असल्यामुळें माझा आबासाहेबांशीं संबंध येत नव्हता. पण मला ते ओळखतील आणि घोटाळा होईल अशी मला भीति वाटत होती. नंतर त्यांना दिसत नाहीं, एका फुटावरूनहि दुसऱ्याची व्यवस्थित ओळख पटत नाहीं असें तिनेंच मला सांगितलें.

'आणि तें खरें होतें. विलासनें मला त्यांच्याकडे नेलें आणि त्यांनीं मला मुळींच ओळखलें नाहीं. सर्व व्यवस्थित जुळून आलें होतें. आपलें रहस्य आबासाहेबांना कधींच कळवायचें नाहीं अशी मीं शपथहि घेतली होती. त्यांना तें सांगण्याची कांहीं अवश्यकताहि नव्हती ...'

'आणि तरीहि तूं त्यांना तें आज दुपारीं मुद्दाम सांगितलेंस.' उग्र स्वरांत झुंजार म्हणाला.

'होय, पण मी तुम्हांला तेंच सांगत आहें.' तो दुर्दैवी तरुण म्हणाला, "एकदां त्यांनीं माझी माहिती विचारली. ते मला माझ्या आई-वडिलांबद्दल प्रश्न विचारूं लागले. त्यावेळीं मीं त्यांना कांहीं थापा मारल्या, पण तेच माझ्या सज्जन आई-वडिलांच्या मृत्यूला कारण झाले ही माझ्या गोष्ट मनाला लागली. त्यानंतर केवळ विलासिनीच्या प्रेमामुळेंच मी कांहीं वेळां त्यांच्या-कडे गेलों, पण लग्न झाल्यानंतर त्यांचें एकदांहि तोंड पहावयाचें नाहीं असें मीं ठरवलें होतें.'

'पण बारा वर्षांपूर्वीं घडलेल्या गोष्टीबद्दल तुझ्यासारखा सुशिक्षित माण-सानें त्यांचा द्वेष करावा, हें आश्चर्य आहे.' झुंजार म्हणाला, 'मला वाटतें, आणखी कांहींतरी वेगळें कारण असावें.'

'त्यांनीं त्यांच्या मुलीला दिलेल्या वाईट वागणुकीमुळें मी त्यांचा तिर-स्कारच करतों.' शरद म्हणाला, 'तुम्हांला तें समजेल असें मला वाटत नाहीं ... ते तिचा प्रत्यक्ष द्वेष करतात असें मलाहि वाटत नाहीं. पण ते तिच्या बाबतींत कमालीचे बेपर्वा आहेत. 'आपले यशस्वी खटले' या नांवाचें ते एक पुस्तक लिहीत आहेत. त्याबद्दल आणि रामलालबद्दल काय ती त्यांना आत्मीयता वाटते.

'ती बाप-लेकाची जोडी अरण्यांतल्या योग्याप्रमाणें त्या गरूड निवासांत राहते. विलास जेव्हां शाळेच्या बोर्डिंगांतून घरीं गेली, तेव्हां पाण्याबाहेर ओढलेल्या माशाप्रमाणें तिची अवस्था झाली. तिची आई कित्येक वर्षांपूर्वीं वारली. त्या घरांत फक्त ते दोघे होते आणि त्यांना तिच्याबद्दल अंशमात्रहि सहानुभूति नव्हती.

'तिला तें सहन झालें नाहीं. एक वर्ष तिनें रोज बापाबरोबर कटकटी कर-ण्यांत कसें तरी ढकललें. नंतर मुंबईंत रहाण्यासाठीं दरमहा पैसे द्यावे अशी मागणी केली. प्रथम त्यांनीं तिचें म्हणणें फेटाळलेंच होतें. पण नंतर घरां-तील वातावरण तंग बनल्यामुळें त्यांनीं तें कबूल केलें.

'विलासनें ती माटुंग्याची छोटी जागा मिळविली आणि ती नोकरी शोधूं लागली. तिला स्वतंत्र व्हावयाचें होतें. तिनें ती मिळविलीहि. गेले अठरा महिने ती वडिलांची एक पैहि घेत नव्हती. पूर्ण स्वतंत्र होती.'

'आतां चित्र स्पष्ट झालें. पण आजच्या दुपारचें काय?' झुंजारनें

विचारलें.

'तेथल्या एका ओळखीच्या पाहुण्याच्या आग्रहामुळें मीं थोडें मद्य घेतलें होतें.' तो ओशाळून म्हणाला, 'मला मद्याची संवय नाहीं आणि त्या डुलकींत माझ्या हातून तो गाढवपणा घडला. म्हाताऱ्याची जिरव-ण्याची ती कल्पना मला फार आवडली. आतां लग्न झाल्यानंतर तो काय करणार ! फार तर संबंध तोडील ! आणि मला त्यांच्याबरोबर संबंध ठेवा-यचेच नव्हते.

'म्हणून मीं त्याला बैठकीच्या खोलींत नेलें आणि मोठ्या ऐटीनें तें सांगितलें. तें ऐकून त्याला झटका येईल अशी मात्र मला कल्पना नव्हती. झटका येऊनहि त्यानें माझ्यावर सूड उगविण्याची संधि साधली. मधुचंद्राचा बेत रद्द झाला आणि मी माझ्याच गाढवपणामुळें असा इथें येऊन एकटाच बसलों.

'नंतर तो मंजूच्या खुनाचा प्रकार घडला. त्या मुलीला कुणीं आणि का ठार करावें ? आणि तसें करतांना आनंदी मोरे प्रकरणाची हुबेहूब नक्कल कां करावी ? पण तुम्ही यांत कसे ? तुम्ही कोण हें अद्याप मला माहीत नाहीं. तुम्ही पोलिसांपैकीं असाल असें वाटत नाहीं.'

'नाहीं. आमचा पोलिसांशीं संबंध नाहीं. पण झुंजार हें नांव ऐकून तुझ्या कांहींच लक्षांत येत नाहीं ? तूं या महाराष्ट्र राज्यांतच रहातोस ना ?'

'झुंजार ? नाहीं... अरे देवा ! तुम्हींच ते पराक्रमी झुंजार ! तुमच्या-बद्दल मी अनेक चमत्कारिक गोष्टी वाचल्या आहेत...'

'त्या सगळ्याच खऱ्या नाहींत.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'पण आतां मी बोलणार आहें. तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास बसला आहे. त्या परिस्थितींत मींहि तुझ्याप्रमाणेंच केलें असतें. तूं खुनी आहेस असें आबा-साहेबांना वाटतें आणि मधुचंद्रासाठीं बाहेरगांवीं नेऊन तूं त्यांच्या मुलीचा खून करशील अशी त्यांना भीति वाटते.'

'अरे देवा !' शरदला धक्काच बसला, 'ही कल्पनाच किती विचित्र—'

'पण त्यांना ती विचित्र वाटत नाहीं.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'बारा वर्षांपूर्वींच तुला फांसावर चढवायला हवें होतें असें त्यांचें म्हणणें आहे. ते तुला त्यावेळींहि वेडा समजत नव्हते आणि आतांहि नाहीं. मला भाड्यानें घेण्याचा त्यांचा हेतु तुला सांगूं काय ?'

'तुम्हीं माझ्याशीं बोलावें, घटस्फोटाबद्दल माझें मन वळवावें...'

'साफ चूक !' झुंजार म्हणाला, 'तुझा खून करण्यासाठीं त्यांनीं माझी नेमणूक केली आहे !'

'मला ठार करण्यासाठीं ?' घाबरुन–दचकून शरद म्हणाला, 'तर मग म्ही त्यासाठींच येथें ...'

'शरद, आबासाहेबांनीं केली तीच चूक तूंहि करूं नकोस !' झुंजार मध्येंच णाला, 'मी भाडोत्री मारेकरी नाहीं! मी केवळ कुतूहलानें येथें आलों. अपघात सावा अशाप्रकारें तुला ठार करावें अशी आबासाहेबांची इच्छा आहे. त्या ांतून सुटण्यासाठीं त्यांनीं अगदीं साधा उपाय शोधून काढला होता.'

'अरे देवा ! त्यांच्यासारखा वकील खून करण्याची योजना आंखतो यावर ज्ञा विश्वासच बसत नाहीं.'

'नीट विचार कर ! आपल्या मुलीचा विवाह खुनी रघुवीरबरोबर झाला, त्यांना विवाहाच्या दिवशींच समजलें. तूं त्यांच्या मुलीचा खून करशील शी त्यांची प्रामाणिक समजूत आहे. ती गोष्ट उघडकीस आल्यानंतर आपल्या ूचे धिंडवडे निघतील ही भीति त्यांना आहेच. तेव्हां तूं अपघातांत ठार लास तर त्यांची सर्व विवंचना नाहींशी होणार होती आणि मला एक क्ष रुपये मिळणार होते.'

'लक्ष रुपये ! ते तेवढी रक्कम देण्यास तयार आहेत ? आणि तुम्हीं ते कारलेत ?'

'तुला इतकें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.' झुंजार हंसून म्हणाला, 'मी ापटींत कित्येकांचे मुडदे पाडीन; पण असला खून करणार नाहीं.'

बारा वर्षांपूर्वीं दुर्दैवामुळें शरदच्या गळ्याला फांस लागणार होता आणि तां कुणीतरी कारस्थानी माणूस त्याचा बळी घेण्याचा प्रयत्न करीत आहे झुंजारच्या लक्षांत आलें होतें. त्या दोन प्रकरणांचा कांहीं संबंध असावा हि दिसत होतें. शरद निरपराधी आहे अशी विजयेचीहि खात्री पटली ी.

'पण तो म्हातारा इतकी खोटी बतावणी कशी करूं शकला ?' शरदनें चर्यानें विचारलें, 'डॉक्टर तेथें होते. डॉक्टरांची फसगत होणें शक्य ीं.'

'डॉक्टरांची फसगत झाली नाहीं, म्हाताऱ्यानें त्यांचें मन वळविलें. मात्र अगदीं साधी फसवणूक आहे. आबासाहेबांचें डोकें फिरलें आहे असें डॉक्ट- ा वाटतें.'

'पण मंजूला कां ठार करण्यांत आलें ? आणि तिला अगदीं आनंदीप्रमाणें करण्यांत हेतु कोणता ? आणि तो नीच माणूस रक्तानें माखलेले हात ासाठीं येथें कां आला ?'

तुझ्या मानेला फांस लावण्यासाठीं.' झुंजार म्हणाला, 'कुणीतरी कार-

स्थानी माणूस तुझ्याविरुद्ध आहे, पण मी तुझ्या बाजूचा आहें, आणि तुल
मदत करणार आहें. ज्याचें साडेबारा वाजतां माझ्याबरोबर टेलिफोनवरू
बोलणें झालें तोच खुनी असावा असें मला वाटतें. तो जें बोलला तें तूं बो
शकला नसतास.'

'तो काय म्हणाला ?' शरदनें झुंजारकडे टक लावून पहात विचारलें
'आणि तुम्हीं जर आबासाहेबांची कामगिरी नाकारली होती तर मल
टेलिफोन तरी कां केला होता ?'

'हा मुद्दा चांगला आहे.' झुंजार म्हणाला, 'पण तूं असा संशयानें पा
नकोस. मला तुझ्याशीं बोलायचें होतें, तुला प्रत्यक्ष पहावयाचें होतें म्हणू
मीं टेलिफोन केला होता. आबासाहेबांना ज्याचा खून करावयाचा तो माणू
कोणत्या प्रकारचा आहे, तें मला स्वतःला अजमावयाचें होतें. तो म्हणाला की
'मी घरांत एकटाच आहें नोकरांना संध्याकाळींच बाहेर पाठविलें आहे
आणि ती गोष्ट मला चमत्कारिक वाटली. त्या घरांत नोकर नसणारच
कारण तुम्ही मधुचंद्रावरून परत यायला एक महिना तरी लागणार होता !

'तें खरें आहे.' शरद म्हणाला, 'मीं काल सकाळपासून नोकरांना महि
न्याची रजा दिली होती.'

'काय घडलें हें तर्कानें ओळखतां येतें.' झुंजार म्हणाला, 'कुणीतरी तुझ्
बायकोच्या घरीं गेलें. तेथें एकटीच मोलकरीण असणार हें त्याला माही
होतें आणि त्यानेंच तुला टेलिफोन करण्यास मोलकरणीचें मन वळवि
त्यावरून तो माणूस तिच्या ओळखीचा असावा आणि तिला संशय या
असा नव्हता हेंहि स्पष्ट आहे. तूं येत आहेस असें तिनें कळविताच त्या
पाठीमागून अचानक हल्ला करून तिचा खून केला. तसें करतांना त्य
आनंदी मोरे प्रकरणाची इतकी बेमालूम नक्कल केली कीं त्यानें त्या घरा
दारहि अर्धवट उघडें ठेवलें होतें.'

'होय. अर्धवट उघडें दार ही त्याची निशाणी दिसते.' विजया म्हणाल

'विजू, ही एक खरी कल्पना आहे.' झुंजार म्हणाला, 'शरद, तूं मा
ग्याला जात असतांना खुनी इकडे यावयास निघाला होता. कारण तूं घर
नसणार हें त्याला माहीत होतें.'

'पण मीं येथून जातांना दार अर्धवट उघडें टाकलें नव्हतें.'

'होय. पण ह्या असल्या घरांत प्रवेश करणें त्याला कठीण नव्हतें.
आपण पाठीमागल्या खिडक्या तपासल्या तर त्यांतील एक त्यानें उघडले
दिसेल अशी माझी खात्री आहे. तो माणूस रक्तानें माखला होता. मो
चालवितांना त्यानें रक्तानें माखलेले कपडे दडविण्यासाठीं वर रेनकोट
विला असेल. त्यानें कदाचित् आपला हातरुमाल मुद्दामच मंजूच्या रक्
बुडविला असेल. त्यामुळेंच बेसिनमधील पाणी इतकें लाल बनलें होतें.'

'भयंकर !' कांपऱ्या आवाजांत विजया म्हणाली, 'तो प्रत्यक्ष सैतानच असला पाहिजे, पण जरा थांबा. आपण मंजूच्या घराजवळ गेलों त्यावेळीं आपणांला मोटार दिसली तिचें काय ?'

'त्या मोटारींत खुनी असणें शक्य नाहीं. ती दुसरीच कुणाची मोटार असणार.' झुंजार म्हणाला, 'विजू, तो सैतान आहे यांत शंकाच नाहीं. तो या घरांत असतांनाच मी टेलिफोन केला.'

'पण त्यानें उत्तर कां द्यावें ?' शरदनें विचारलें, 'घर रिकामें होतें. त्यानें घंटी तशीच वाजत राहूं द्यायची होती. तुम्हीं मी घरांत नाहीं अशा समजुतीनें बोलणें बंद केलें असतें'

'कारण तो मूर्ख होता.' झुंजारनें लागलीच उत्तर दिलें, 'सर्व प्रख्यात बदमाष कधी तरी चूक करतात तशी त्यानेंहि केली. खरें म्हटलें तर बहुतेक खुनी अनेक चुका करतात. होय शरद, त्या अज्ञात खुनी माणसानें माझ्याशीं बोलण्यांत फार मोठी चूक केली आहे.'

'पण ती चूक असावी असें तुम्हांला खरोखरच वाटतें काय ?' त्यानें विचारलें.

'होय. जर त्याला विचार करण्यास वेळ मिळता तर तो टेलिफोनपासून अर्धा मैल जवळहि गेला नसता. कदाचित त्या आवाजामुळें शेजाऱ्यांचें या घराकडे लक्ष जाईल अशी त्याला भीति वाटली असावी. माझें नांव समजे-पर्यंत तो अधीर दिसत होता. नंतर त्यानें मी आल्यास चालेल असें सांगितलें.'

'तुमच्या नांवाचा त्याच्यावर कांहीं परिणाम झाला असेल काय ?'

'माहीत नाहीं. कदाचित् झालाहि असेल.' झुंजार म्हणाला आणि त्यानें विचार केला, 'मला वाटतें त्याच्यावर परिणाम झाला. कुप्रसिद्ध झुंजारला या गुन्ह्यांत अडकविण्याची ती संधि चांगली होती. मी आलों तर मला तें रक्तानें भरलेलें 'बेसिन' दिसणार होतें. माझी कल्पना आहे कीं त्यावेळीं त्याचा बराच गोंधळ उडाला होता. येथून जातांना त्यानें जी भलतीच हुषारी दाखविण्याचा प्रयत्न केला त्यावरून त्याची बुद्धि विशेष ठिकाणावर नव्हती असेंच म्हणावें लागेल.'

'भलतीच हुषारी ?' शरदनें बुचकळ्यांत पडून विचारलें.

'तें माझ्या लक्षांत आलें.' विजया लागलीच म्हणाली, 'हा पत्ता पहा !'

त्यानें विजयेनें पुढें धरलेल्या पॅडकडे पाहिलें आणि तो म्हणाला, 'मीं हें लिहिलें नाहीं. विलासचा पत्ता लिहून ठेवण्याची मला गरजच काय ?'

'तो पत्ता त्यानें माझ्यासाठीं लिहून ठेवला.' झुंजार म्हणाला, 'मला यांत गुंतविण्याचा त्याचा विचार होता. तें रक्त व हा पत्ता पहातांच मी शिवसदनमध्यें जाईन अशी त्याची खात्री होती.'

'पण त्याचा डाव मला गुंतविण्याचा होता ना ?' शरदनें विचारलें, 'तर मग त्यानें तुम्हांला यांत खेंचण्याचा कां प्रयत्न करावा ?'

'त्यावेळीं त्याचा गोंधळ उडाला होता हें मीं तुला सांगितलेंच आहे.' झुंजार म्हणाला, 'पण यावरून तो धंदेवाईक खुनी दिसत नाहीं. तो थोडा दारूबाजहि असावा. शरद, तूं कांहीं सुचवूं शकतोस काय ?'

'मी ? मला हें समजत नाहीं...'

'तुला फांसावर चढविण्यासाठीं इतकी धडपड करणारा तो माणूस कोण असावा हें तूं सुचवूं शकतोस काय ? त्या माणसानें तुला टेलिफोनवरून खोटा निरोप देण्यास मंजूचें मन वळविलें होतें. तुला कुणी शत्रु आहेत काय ?'

'माझ्यावर खुनाचा आरोप यावा म्हणून एका निरपराध मोलकरणीचा खून करणारा कुणी असेल असें मला वाटत नाहीं.' शरद म्हणाला, 'हा सर्व प्रकारच भयंकर आहे !'

'तुझ्या त्या विलासच्या बाबतींत तुझा कुणी प्रतिस्पर्धी होता काय ?' झुंजारनें विचारलें.

'नाहीं. कुणीच नाहीं. पण ... छे ! तें अशक्य आहे !'

'तुझ्या मनांत कुणाचा तरी विचार आला होता.' झुंजार म्हणाला.

'होय, पण सुधाकर असें करणार नाही.'

'हा सुधाकर कोण ?' झुंजारनें लागलीच विचारलें.

'सुधाकर रेंदाळकर. तो लग्नाला हजर होता. खूप दारू प्याला होता आणि त्यानें थोडी धांदल उडविली होती.'

'मला त्या रेंदाळकराबद्दल अधिक माहिती सांग.' झुंजार म्हणाला.

'पण त्यांत अर्थ नाही. सुधाकर कित्येक वर्षांपासून विलासच्या मागें लागला होता. त्यानें तिला भंडावून सोडलें होतें. ती त्याचा तिरस्कार करते. तो खूप दारू पिऊन लग्नाला हजर झाला होता. त्यानें तिचा हात पकडला. त्यानें मला घाणेरड्या शिव्या दिल्या. शेवटीं तिनें त्याला बैठकीच्या खोलींत बंद केलें. तो आणखीं गडबड करील अशी तिला भीति वाटली...अरे देवा ! तो तेथें होता !'

'याचा अर्थ काय ?' झुंजारनें विचारलें.

'थांबा ! तुमच्या तें लक्षांत येत नाहीं ?' शरद उत्तेजित स्वरांत म्हणाला, 'समजा, माझें व आबासाहेबांचें बोलणें झालें, त्यावेळीं तो तेथेंच असला तर ? जेव्हां आम्ही तेथें गेलों तेव्हां त्या खोलीचें दार बाहेरून बंद होतें. तें विलासिनीनेंच बंद केलें होतें. तेव्हां त्याला बाहेर पडतां येणार नव्हतें आणि आम्ही तेथें गेलों तेव्हां तो तेथेंच होता.'

'पण तूं त्याला तेथें पाहिला नाहीस ना ?'

'मला खोली रिकामी दिसली. पण आमचा आवाज ऐकून तो कुठेंतरी लपला असावा. तसें असलें तर त्यानें आमचें सर्व बोलणें ऐकलें असणार!'

'म्हणजे तूंच रघुवीर तिरंदाज आहेस हें त्याला समजलें असणार.' झुंजार विचारांत गढून म्हणाला.

'ती बरीच मोठी खोली आहे. खिडक्यांवर, फडताळावर जाड व लांब-रुंद पडदे सोडले आहेत. तो कुठेंहि लपूं शकला असता.' शरद पुढें म्हणाला, 'होय, जर तो लपला असला तर तें आम्हांला समजणें शक्य नव्हतें, पण तो तर त्यावेळीं खूप झिंगला होता.'

'तो झिंगला असो वा नसो, तुझें आबासाहेबांबरोबरचें बोलणें ऐकून तो तत्काळ शुद्धीवर आला असणार.' झुंजार गंभीर स्वरांत म्हणाला.

'त्यामुळें त्याला चांगली संधि मिळणार होती.'

'पण संधि कसली ?'

'तुला जर मंजूच्या खुनाबद्दल अटक झाली तर काय घडेल ? तुला सरळ पोलीस ठाण्यावर नेतील व प्रथम तुझ्या हाताचे ठसे घेतील. तूंच रघुवीर तिरंदाज आहेस हें कांहीं मिनिटांतच पोलीस शोधून काढतील. त्यानंतर तुझें काय होईल ?'

'अरे देवा!' आकाशांतून कुऱ्हाड डोक्यावर कोसळावी त्याप्रमाणें शरद हताशपणें म्हणाला.

'उपलब्ध पुराव्यावरून पोलीस तुझ्यावर मंजूच्या खुनाचा आरोप ठेवतीलच पण तसें शक्य झालें नाहीं तर ते पुन्हां मोठ्या बंदोबस्तानें तुझी रवानगी वेड्याच्या हॉस्पिटलांत करतील.'

'नाहीं!' घाबरून धापा टाकीत शरद म्हणाला, 'ते मला हॉस्पिटलांत पाठवूं शकणार नाहींत ...'

'स्वतःची फसवणूक करूं नकोस!' झुंजार म्हणाला, 'ते तुला लागलीच पाठवितील. पण तसें करण्याची आवश्यकताहि भासणार नाहीं. ते तुला मंजूच्या खुनाबद्दल फांसावर चढवितील. छान! असला भयानक पेंच माझ्या तरी आठवणींत नाहीं.'

'पण मला हें समजतच नाहीं ...'

'शरद, मलाहि तें समजत नाहीं.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'पण एक गोष्ट कुणालाहि समजण्यासारखी स्पष्ट आहे. त्या पाजी माणसानें बिचाऱ्या आबासाहेबांची योजना उलथून टाकली आहे. त्यामुळें मला काम करण्यास वाव मिळाला आहे!'

'आतां मीं करावें तरी काय ?' बराच वेळ पसरलेल्या शांततेचा भंग करीत शरद म्हणाला, 'तुम्हांला निष्कारण भानगडींत गुंतविणें मला आवडणार नाहीं ...'

'कांहींतरी वेड्यासारखें बोलूं नका.' विजया त्याला म्हणाली, 'तुम्ही आम्हांला गुंतविलें नाहीं, आम्ही स्वतःच गुंतलों आहोंत. आणि असली गुंतागुंत आमच्या साहेबांना फार आवडते.'

'तुम्ही यांच्या पत्नी ना ? मीं फक्त एकदांच तुमचा फोटो पाहिला होता.'

'ही माझी बायको विजया ऊर्फ विजू. तुला तिचे हवे तेवढे फोटो पहावयास मिळतील.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'पण आधीं मला त्या सुधाकराची अधिक माहिती सांग'

'पण त्याचें हें काम नसणार.' शरद म्हणाला, 'विलास त्याला कित्येक वर्षे ओळखते आणि गेले अठरा महिने मीहि त्याला ओळखतों. तो खूप दारू पितो. त्यानें आपलें आयुष्य फुकटच घालविलें आहे. पण तो कुणाचा अशाप्रकारें खून करील यावर मी स्वप्नांतहि विश्वास ठेवणार नाहीं.'

'तूं विश्वास ठेवण्याचा प्रश्नच नाहीं. तो कोण, कुठें रहातो आणि जगण्यासाठीं काय करतो तें मला सांग.' झुंजार म्हणाला.

'तो काय उद्योग करतो तें मला माहीत नाहीं. एकतर त्याचें खाजगी उत्पन्न असावें, किंवा तो रेस-जुगार यावर पैसे मिळवीत असावा.' शरद म्हणाला, 'पण एका गोष्टीशीं तो जुळतो. तो टेलिफोन करण्यास मजूचें मन वळवूं शकला असता.'

'असें तुला वाटतें ?' झुंजारनें विचारलें.

'मला तें माहीत आहे. मला आतां कांहीं गोष्टी आठवत आहेत.' शरद म्हणाला, 'विलास कधीं घरांत असते हें सांगण्यासाठीं त्यानें मंजूला एकदां लांचहि दिली होती आणि विशेष म्हणजे मंजू त्याच्यावर खूष होती. दोन-तीन वेळां तिनें मालकिणीच्या परवानगीशिवाय त्याला आंत घेतलें होतें. या गोष्टी मला विलासनेंच सांगितल्या होत्या. तेव्हां त्याच्या सांगण्यावरून मंजू खात्रीनें टेलिफोन करील.'

'अस्सें ?' झुंजार म्हणाला. पण तो अचानक उठून त्वरेनें खिडकीजवळ गेला होता. विजयेला किंवा शरदला कांहींच ऐकूं आलें नव्हतें. पण झुंजारचे कान भारीच तिखट होते. तो उभा रहातांच विजयाहि उभी राहिली होती.

'काय झालें ?' शरदनें घाबरून विचारलें.

'जलद गतीची मोटार येत आहे. ती पहा बाहेर थांबली !' झुंजार म्हणाला, 'मित्रहो, येथून पाय काढण्याची तयारी करा. दोघे पोलीस मोटारींतून उतरले कुणीतरी मुळींच वेळ फुकट घालविलेला नाहीं !'

'पोलीस आणि इतक्यांतच ?' अगदीं हलक्या आवाजांत शरद म्हणाला, 'पण त्यांना तें कसें समजणार ?'

'शरदभाऊ, ही प्रश्नोत्तराची वेळ नव्हे. एकदां तूं त्यांच्या हातीं सांपड-णार कीं तुझें जहाज बुडालेंच म्हणून समज. या घराला मागील दार असेल ना ? तर मग चला—'

'पण मी फरारी कसा होऊं ?' शरद म्हणाला.

'आतां चर्चा बंद !' झुंजार म्हणाला.

त्यानें मागील दारानें त्याला बाहेर काढलें. विजया बरोबर होतीच. ते बाजूच्या गल्लींतून रस्त्यावर आले तेव्हां त्यांना शरदच्या घराच्या फाटका-समोर उभी असलेली पोलिसांची मोटार दिसली. विजयेची मोटार थोडी मागें होती.

झुंजारनें शरदचा हात पकडून मोटारीकडे धांव घेतली. विजयेनें त्यांच्या आधीं मोटार गांठली होती. झुंजारनें कांहीं सेकंदांतच मोटार सुरू केली.

'ते पाठलाग करतील !' विजया म्हणाली.

'नाहीं. त्यांच्या मोटारींत कुणीच नाहीं. ड्रायव्हरहि त्या दोघां पोलिसां-बरोबर आंत गेला असावा.' झुंजार म्हणाला.

आणि त्याचेंच म्हणणें खरें ठरलें. पोलीस दार ठोठावीत असतांनाच विजयेची मोटार कितीतरी दूर गेली होती.

'पण आपण जाणार कुठे ?' शरदनें विचारलें, 'झुंजारराव, त्यांना माझी माहिती मिळाल्यानंतर मीं फरारी होण्यांत अर्थ कोणता ? अरे देवा! मीं माझी बाथरूमहि साफ केली नाहीं !'

झुंजार बोलला नाहीं. त्याचें सारें लक्ष मोटार चालविण्याकडे व आजू-बाजूकडे होतें. वीस मिनिटांच्या आंत त्याची मोटार झुंजार महालाच्या पांचव्या मजल्यावरील गॅरेजमध्यें पोहोंचली होती.

'आतां ठीक.' झुंजार मोटारींतून खालीं उतरत म्हणाला, 'मावशी आणि नेताजी गाढ झोपेंत असणार. त्यांना त्रास देतां कामा नये.'

ते बैठकीच्या खोलींत गेले. विजयेनें थर्मास काढून शरदला गरम कॉफी दिली.

'झुंजारराव, तुम्ही मला अशाप्रकारें मदत करतां याबद्दल मी आभारी आहें.' तो म्हणाला, 'पण इतक्या घाईनें पळ काढण्यांत चूक तर झाली नाहीं ना ? समजा, केवळ मंजूच्या खुनाची बातमी कळविण्यासाठीं पोलीस आले असले तर ?'

'आणि जर ते अटक करण्यासाठीं आले असले तर ?' झुंजारनें मध्येंच विचारलें, 'शरद, धोका पत्करण्याची ती वेळ नव्हती'

'पण मी इथें आहें हें सकाळीं तुमच्या नोकरांना समजेल.तुम्ही त्यांची...'

'आमच्या येथें नोकरच नाहींत.' झुंजार म्हणाला, 'एक विजूची मावशी

आहे आणि दुसरा माझा मदतनीस नेताजी आहे. तेव्हां तूं या ठिकाणीं पूर्ण सुरक्षित आहेस. मी हालचाल करणारच आहें. तो सुधाकर–'

'सुधाकरच्या बाबतींत आपण चूक करीत आहों असें अद्यापहि मला वाटतें.' अस्वस्थ स्वरांत शरद म्हणाला, 'त्या माणसाला असल्या प्रकारचा गुन्हा करण्याची हिंमतच होणार नाहीं.'

'तर मग कोण ?' झुंजार म्हणाला, 'फक्त त्यालाच तर तुझें रहस्य माहीत आहे'

'पण जर दारूच्या तालांत त्यानें तें दुसऱ्या कुणाला सांगितलें असलें तर ?' शरदनें विचारलें.

'तर आपल्या शोधाचें क्षेत्र फार विस्तार पावतें.' झुंजार म्हणाला 'पण तुझा हा तर्क बरोबर दिसत नाहीं. एकतर सुधाकर दारूच्या गुंगींत असो वा नसो, असली गोष्ट बोलणार नाही. आणि इतक्या काळजीपूर्वक योजना आंखणारा माणूसच त्याला या अर्ध्या दिवसांत भेटला कसा हाहि प्रश्न शिल्लक रहातोच. आपण आतां कांहीं तास झोंप काढणें बरें.'

त्यानें आपल्या पाहुण्याचा हात धरला आणि तो म्हणाला, 'बिजू, मी पांच मिनिटांत येतों.'

त्यानें तेथें असलेल्या खाजगी लिफ्टचा उपयोग केला नाहीं. त्याऐवजी त्यानें शरदला पुढच्या दारानें बाहेर नेलें. समोर बाग होती. पण डावीकडे एक चौक होता आणि तेथें त्या इमारतीच्या सर्वांत वरच्या मजल्यावर उतरण्यासाठीं जिना होता. त्या पायऱ्या उतरतांच झुंजारनें अवळच्या चावीनें बाजूलाच एक दार उघडलें.

'ही फक्त दोन खोल्यांचीच जागा आहे. पण आंत सर्व व्यवस्था आहे.' झुंजार म्हणाला, 'तूं तेथल्या टेलिफोनचा आणि घंटीचा उपयोग केला नाहींस तर तूं येथें आहेस हें कुणालाहि समजणार नाहीं. ही इमारत बांधल्यापासूनच ही जागा मीं माझ्याजवळ ठेवली आहे'

'म्हणजे वरच्या जागेप्रमाणेंच या छोटया फ्लॅटचेंहि तुम्ही भाडें भरतां?'

'शरदभाऊ, मी आणि बिजू या इमारतीचे मालक आहोंत.' झुंजारनें शांतपणें खुलासा केला, 'हा झुंजारमहाल आमच्या मालकीचा आहे हेंहि तुला माहीत नाहीं ? मीं ही वरची छोटी जागा आजच्या प्रसंगासारख्या वेळीं वापरतां यावी म्हणून कुणाला दिलेली नाहीं आणि ती अशाप्रकारें बांधण्यांत आली आहे कीं या मजल्यावर रहाणाऱ्यांनाहि ती माहीत नाहीं. तुला येथें येतांना कुणीं पाहिलेलें नाहीं. त्यामुळें तूं येथें आहेस हें कुणालाहि समजणार नाहीं'

'झुंजारराव, तुम्ही खरोखरच चांगले आहांत.' शरद मनःपूर्वक म्हणाला, 'तुमचे कसे आभार मानावेत तेंच मला समजत नाहीं.'

'तूं आतां कांहींहि बोलूं नकोस. शांत झोंप घेण्याचा प्रयत्न कर. आणि खाण्यापिण्याबद्दल चिंता करूं नकोस. सकाळीं मी स्वत: तुझा न्याहारीचा ट्रे आणीन व त्यावेळीं आपण इतर गोष्टी बोलूं. तूं सर्व माझ्यावर सोंपव. या संकटांतून तुला बाहेर काढण्यासाठीं मी शक्य तें सर्व करीन.'

झुंजारनें आणखीं कांहीं न बोलतां त्याचा निरोप घेतला आणि तो जिन्यानें वर आला. विजया बैठकीच्या खोलींतच बसली होती. झुंजार खुषींत होता तर ती विचारांत गढलेली आणि अस्वस्थ दिसत होती. त्याला तें पाहून हंसूं आलें.

'बिजू यांत चिंता करण्यासारखें कांहींच नाहीं.' तो तिच्या खांद्यावर हात ठेवून हंसत म्हणाला, 'ही एका नवीन झुंजारकथेची सुरुवात आहे आणि फार फक्कड सुरुवात झाली आहे!'

## ९ : आनंदरावहि आले !

पण विजयेनें त्याला उत्तेजन दिलें नाहीं. 'हें सर्व बोलायला ठीक आहे. म्हणे फक्कड सुरुवात!' ती म्हणाली 'हें अगदीं हिडीस आणि वाईट प्रकरण आहे. तरुणींच्या माना कापण्यांत येत आहेत...'

'तरुणींच्या नव्हे' झुंजार म्हणाला, 'एकाच तरुणीची.'

'दोन!' विजया म्हणाली, 'त्या बारा वर्षांपूर्वीच्या आनंदीचें काय?'

'ठीक आहे. तुझ्या मनाप्रमाणें होऊं दे. दोन तरुणी'

'पण तुम्ही शरदला मदत ती काय करणार?' ती पुढें म्हणाली, 'हें तुमचें काम नाहीं.'

'या मुद्यावर आपण सहमत नाहीं.' झुंजार म्हणाला, 'त्या माझ्याबरोबर टेलिफोनवरून बोलणाऱ्या माणसानें, मीं नांव सांगतांच मला हेतुपूर्वक या प्रकरणांत अडकविण्याचा प्रयत्न केला होता आणि मला तें आवडत नाहीं. तेव्हां त्यानें चूक केली हें त्याला पटविलें पाहिजे.

'शिवाय शरदनें त्या आनंदी मोरेचा खून केला नव्हता आणि मंजूलाहि त्यानें ठार केलें नाहीं असें माझें मत आहे. त्याला जर मदत मिळाली नाहीं तर त्याचें आयुष्यच संपलें हें तुझ्या लक्षांत येत नाहीं काय? त्याचें कांहींहि झालें तरी हरकत नाहीं, पण मीं आपले खांदे झटकून यांतून बाहेर पडावें असें तुझें म्हणणें आहे काय?'

'नाहीं!' ती त्वरेनें म्हणाली.

'तर मग त्याला त्याच्या घरांतून बाहेर काढून येथें आणणें आवश्यक नव्हतें काय? आपण त्याला अगदीं ऐनवेळीं बाहेर काढलें अशी माझी समजूत आहे. आतां उद्यांची सकाळ बरोबर काय घेऊन उजाडते तें आपण पाहूं.'

'पण त्या बाबासाहेबांचें आणि त्यांच्या नाकारलेल्या कामगिरीचें काय?'

'मी उद्यां त्या म्हाताऱ्याला भेटणार आहें.' झुंजार म्हणाला.

त्यानंतर आणखी चर्चा करण्यास झुंजारनें नकार दिला. ते दोघेहि पलंगावर पडले आणि त्यांना तसल्या प्रसंगांची इतकी संवय झाली होती कीं पांच मिनिटांच्या आंतच दोघांनाहि गाढ झोंप लागली होती.

आपण लवकरच जागे झालों असें झुंजारला वाटलें, पण त्यानें घड्याळाकडे पाहिलें तेव्हां साडेसात वाजले आहेत असें त्याला दिसलें. पण झुंजारच्या हिशेबानें ती फार सकाळ होती. मावशी दार ठोठावीत होती आणि आनंदराव भेटावयास आले आहेत असें सांगत होती. आनंदराव फार संतापलेले दिसत आहेत आणि जर झुंजारनें त्यांची लवकर भेट घेतली नाहीं तर ते सामानाची आदळआपट सुरू करतील अशीहि तिनें हळूंच सूचना दिली.

'त्यांना यावेळीं काय हवें असावें?' घडपडत उठून बसत विजयेनें विचारलें.

'जेव्हां आनंदराव असे गेंड्यासारखे चवताळलेले असतात तेव्हां कांहीं भानगड ही असतेच.' झुंजार हंसून म्हणाला, 'पण विजू, असलें कांहीं घडेल असें मला वाटतच होतें.'

त्यानें तोंड धुतलें. सिगारेट पेटविली आणि तो चप्पल चढवून बैठकीच्या खोलींत गेला. 'आनंदराव, हें कांहीं चांगलें नाहीं.' तो जांभई देत म्हणाला, 'अशा पहांटेच्या वेळीं माझी झोंपमोड करतां याचा अर्थ काय? आणि मेहेरबानी करून असे डोळे वटारून पाहूं नका.'

सी. आय्. डी. सुपरिंटेंडेंट आनंदराव थरथरत होते. त्यांच्या डोळ्यांतून आग पाखडत होती आणि ते चिडलेल्या वाघाप्रमाणें दिसत होते.

'झुंजार, कपडे चढव आणि चावटपणा करूं नकोस!' त्यांनीं बजाविलें, 'मी तुला अटक करीत आहें.'

'तुमच्याजवळ वॉरंट आहे काय?' सिगारेटचा धूर नाकांतून बाहेर सोडीत झुंजारनें विचारलें.

'मला वॉरंटची गरज नाहीं.' आनंदराव गरजले, 'तुला आतां सी. आय्. डी. ऑफिसांत आलें पाहिजे आणि...'

'जरा थांबा.' झुंजार शांतपणें मध्येंच म्हणाला, 'तुम्हीं हें काय चालविलें आहे? मला अटक! आनंदराव, जरा शहाण्यासारखे बोला.'

'झुंजार, तूं गेल्या रात्रीं काय करीत होतास?' आनंदरावांनीं जोरांत विचारलें, 'लबाडी करूं नकोस, नाहींतर मला खरोखरच राग येईल.'

'म्हणजे तुम्ही आतां खोटे रागावलां आहांत?' झुंजारनें आश्चर्यानें विचारलें, 'जर तुम्हीं काळजी घेतली नाहींत तर दहा–बारा ठिकाणीं तरी

त्याप्रमाणें फुटाल अशी तुमची अवस्था झाली आहे. शांत व्हा आणि ही मची काय भानगड आहे तें मला सांगा.'

' मी काय बोलत आहें तें तुला बरोबर समजतें.' आनंदराव ओरडून हणाले, ' मध्यरात्रीनंतर तूं एका खुनी माणसाला पोलिसांच्या हातांतून सटण्यास मदत केलीस आणि खुन्याचा साथीदार म्हणून मी तुला टक करणार आहें.'

' खुन्याचा साथीदार ? नाहीं आनंदराव, तें तुम्हांला जमायचें नाहीं. मच्याजवळ पुरावा कुठें आहे ?' झुंजार आरामानें तेथल्या कोचावर सून पाय पसरीत म्हणाला, ' तें सोडा ! तुम्ही कांहीं तुमच्या एखाद्या रट्या चोराबरोबर बोलत नाहीं. असल्या फुसक्या दटावणीनें तुम्ही मला बरवूं शकणार नाहीं.'

' ठीक ! कदाचित् मीच मूर्ख असेन !' आनंदराव रागानें म्हणाले, तूं असा बर्फाप्रमाणें शांत बसून माझें म्हणणें नाकारशील हें मीं आधींच ळखायला हवें होतें. पण झुंजार, या खेपेला तूं मर्यादा ओलांडली आहेस!'

' मर्यादा ओलांडली म्हणजे केलें काय ?'

' तूं शरदला फरारी होण्यास मदत केलीस...'

' शरद ? नांव तर अगदीं ओळखीचें दिसतें.' झुंजार मध्येंच म्हणाला, मीं अगदीं अलीकडे तें नांव ऐकलें आहे.'

' स आतां मला जास्त चिडवूं नकोस.' आनंदराव संतापानें म्हणाले, तूं गेल्या रात्रीं शरदबरोबर होतास असा माझ्याजवळ पुरावा आहे. तेव्हां तें नाकारूं नकोस. कालच शरद हंजरनवीसाचें लग्न जुने प्रसिद्ध वकील बासाहेब गरूड यांच्या मुलीबरोबर झालें ...'

' ही बातमी शिळी आहे.' झुंजार मध्येंच म्हणाला, ' मी ती वर्तमानांत वाचली.'

' गेल्या रात्रीं एक खून झाला.' कठोर स्वरांत आनंदराव म्हणाले, बाबासाहेबांच्या मुलीच्या मोलकरणीचा—मंजुळा डोंगरेचा—खून माटुंगा ील एका इमारतींत झाला. माहिती मिळाल्यामुळें पोलीस शरदला क करण्यासाठीं त्याच्या घरीं गेले. दहा वर्षांपूर्वी वेड्याच्या हॉस्पिटलांतून तरी होणारा गुन्हेगार वेडा रघुवीर तिरंदाज आणि शरद ही एकच क्ति असावी असा त्यांना संशय होता. कारण पूर्वी तिरंदाजानें केलेल्या ासारखाच मंजुळेचा खून होता...'

' माहिती मिळाल्यामुळें ?' झुंजार म्हणाला, ' आनंदराव, मीं माझा सांगावा काय ? कुणातरी निनांवी माणसानें टेलिफोन केला होता. ंगा येथील अमूक घरांत एका तरुणीचें प्रेत पडलें आहे आणि त्याबद्दल क ठिकाणीं रहाणाऱ्या शरद ऊर्फ रघुवीर तिरंदाजाला अटक केल्यास

पोलिसांचा फायदा होईल असें त्या माणसानें सांगितलें, खरें ना ?'

आनंदराव विस्फारित नजरेनें झुंजारकडे पहातच राहिले. 'अरे देवा ते म्हणाले, 'ती माहिती तूंच दिली होतीस !'

'आनंदराव, कृपा करून मला इतक्या खालच्या पायरीवर खेंचूं न झुंजार म्हणाला, 'मी पोलिसांना तसली माहिती निनांवी टेलिफोन क कळवीन हें कधीं शक्य आहे काय ? आणि या खुनाबद्दल मला माहिती असें तुम्हीं गृहीत कां धरावें ?'

'मीं गृहीत धरलें नाहीं मला तें माहीत आहे !' आनंदराव ओर म्हणाले, 'तेव्हां तूं शरदला या ठिकाणीं आणलें आहेस हें कृपा क नाकबूल करूं नकोस. पोलीस चेंबूरला त्याच्या घरीं गेले आणि त्या तूंच त्याला तेथून पळविलेंस. आणि माझा तर्क आहे कीं, तूं त्याला आणलें आहेस.'

'हा तुमचा तर्क अगदींच चुकीचा आहे' झुंजार म्हणाला, 'हवें अ तर ही जागा खुशाल तपासा. मात्र विजूच्या खोलींत शिरण्यापूर्वी दार ठोठावा. ती अद्याप झोंपेंत असणार आणि सूचना न देतां जर डोळे वटारलेला लठ्ठोबा तिच्या खोलींत शिरला तर तिला तें आवड नाहीं.'

आनंदराव हिरमुसले झालेले दिसले. 'ज्याअर्थीं तूं या जागेची त णी करण्यास सांगत आहेस त्याअर्थीं शरद येथें नाहीं हें स्पष्ट अ ते कपाळावर आंठ्या चढवीत म्हणाले, 'पण तूं मला फसविण्यासा तसें बोलशील. ठीक आहे मी ही जागा तपासतोंच.'

'जरा थांबा ! मीं चेंबूरहून शरदला नेलें असें तुम्ही म्हणालांत–हें तुमच्या डोक्यांत कसें शिरलें ?'

'पोलीस त्याच्या घराचें दार ठोठावीत असतांना तेथेंच असलेली मोटार निघून गेली आणि मला मिळालेल्या वर्णनावरून ती मोटार तु बायकोची होती हें मीं ओळखलें.' आनंदराव म्हणाले.

'तुम्हांला त्या मोटारीचा नंबर सांगण्यांत आला काय ?'

'नाहीं.' आनंदरावांनीं सत्य सांगितलें, 'पण तुम्ही दोघें त्या घ होतां असा माझ्याजवळ पुरावा आहे. झुंजार, तूं एका जिवंत बॉम खेळत आहेस हें तुझ्या लक्षांत कसें येत नाहीं ? हा रघुवीर तिरं घातकी व महाभयंकर वेडा आहे. गेलीं दहा वर्षें तो शरद हें नांव ध करून...'

'हा तुमचा केवळ तर्क आहे कीं तुम्हांला ही माहिती आहे ?'

'ऐक झुंजार, तुला मी आणखीं थोडी माहिती देतों.' आनंदराव म्हण 'आपण कोणत्या घाणेरड्या पेंचांत फसत आहोंत हें अद्याप तुझ्या ल

ालेलें दिसत नाहीं. कालच त्याचें गरुडांच्या मुलीबरोबर लग्न झालें. पारीं आबासाहेबांना झटका आला आणि त्याचा मधुचंद्राचा बेत रद्द ाला. तो निराश होऊन मुंबईस आला व नंतर बायकोच्या मुंबईंतील न्हाडीं गेला. त्यानें बहुधा मंजुळेजवळ बाईट मागणी केली असावी तिनें ी नाकारतांच त्यानें खून केला आणि बारा वर्षांपूर्वीं तिरंदाजानें खून केला ोता त्याचीच पुनरावृत्ति केली ...'

'पण असा तुमच्याजवळ पुरावा नाहीं.' झुंजार मध्येंच म्हणाला.

'गेल्या रात्री माटुंगा येथील घरांत शरद गेला होता असा आमच्या- वळ पुरावा नाहीं हें मी कबूल करतों, पण चेंबूर येथील घरांत मंजुळेच्या ताचे डाग सांपडले, त्याच्या बोटांचे ठसे सांपडले व त्यावरून तो रघुवीर रंदाज आहे हें निर्विवाद सिद्ध झालें. आतां तूं सांगितल्याप्रमाणें मी ही ागा तपासणार आहें.'

'जरूर तपासा. पण विजूला मात्र—'

विजया हंसतच तेथें आली तिनें कपडे बदलले होते आणि सकाळच्या बिंदूप्रमाणें ती टवटवीत दिसत होती.

'तुम्हां दोघांचें माझ्यावरून भांडण चाललें आहे कीं काय?' तिनें हंसून चारलें, 'आणि आनंदरावदादा, तुमचा चेहरा इतका भयंकर संताप- ला कां?'

'आतां तूं आलीस!' आनंदराव चिडून म्हणाले, 'अरे देवा! काय पण डी! तुमच्याकडे पाहून ही जहरी नाग–नागिणीची जोडी आहे असें ालाहि वाटेल!'

'कुणाला कांहीहि वाटो, पण या नागिणीच्या उपमेला माझी जोराची कत आहे.' विजया म्हणाली, 'आज तुम्हांला झालें आहे काय?'

'मी गेल्या रात्रीं एका खुनी माणसाला फरारी होण्यास मदत केली असें यांच्या डोक्यांत शिरलें आहे.' झुंजार म्हणाला, 'विजू, असली गंमत पूर्वीं कधीं ऐकली होतीस काय?'

'गंमत? तुम्हां दोघांचे ठसे मला त्या घरांत सांपडले आहेत!' आनंद- ांनीं गर्जना केली.

'हा तुमचा निष्काळजीपणा झाला!' विजयेनें झुंजारला दोष दिला.

'मला हें तुझें म्हणणें मान्य नाहीं.' झुंजार जोरांत म्हणाला, 'एखादा ास आपल्या मित्राला भेटावयास गेला तर तेथून बाहेर पडतांना आपल्या ांचे ठसे नाहींसे करतो काय?'

'म्हणजे, तूं गेल्या रात्रीं तेथें होतास हें कबूल करतोस?' आनंदराव ायी स्वरांत म्हणाले.

'तें नाकबूल करूंच कशाला?' झुंजार म्हणाला, 'त्याला मित्र या

आलें आहे हें शंभर टक्के सिद्ध होतें. पण हें आनंदरावांच्या कां लक्षांत येऊं नये ?'

'कारण नुसतें लक्षांत येण्यांत अर्थ नाहीं. तसें सिद्ध झालें पाहिजे.' विजया म्हणाली, 'कदाचित् त्याला न्याय हवा पण आपलें नांव उघड होऊं नये असें मानणाऱ्या माणसानेंहि टेलिफोन केला असेल.'

'तू हें मनापासून बोलत नाहींस.' झुंजार म्हणाला, 'मला आनंदरावांची गंमत वाटते. मीं त्यांना अगदीं सरळ सत्य सांगितलें तर ते मला खोटारडा म्हणतात. त्यांना मी आणखीं काय सांगूं शकणार होतों ?'

'मी आनंदरावांना दोष देत नाहीं.' ती म्हणाली, 'ती तुमची हकीकत कुणालाहि खरी वाटणार नाहीं आणि आनंदराव त्यावर विश्वास ठेवणार नाहींत म्हणूनच तुम्हीं ती सांगितलीत. ती तुमची लबाडी आहे. तुम्हीं त्या बिचाऱ्यांना अधिकच गोंधळांत पाडलें आहे.'

झुंजार अगदीं मनःपूर्वक हंसला.

'विजू, ती फार चांगलीच गोष्ट आहे. पण आतां मला माझ्या हालचाली सुरू केल्या पाहिजेत.' तो म्हणाला, 'ती वाईट बातमी विलासिनीच्या कानांवर जाण्यापूर्वीं मला, 'गरुड भरारी' मध्यें हजर झालें पाहिजे. मी वेळेवर पोहोंचेनच याबद्दल मला शंका आहे, पण मी प्रयत्न करीन. आबासाहेबांनाहि वाईट बातमीच ऐकावयास मिळणार आहे. कुणींतरी आपली योजना उलथून पाडली हें अर्थातच त्यांना आवडणार नाहीं.'

विजया तयार होत असतांना—तिनें आपणहि येणार असा हट्ट धरला होता—झुंजारनें खालीं जाऊन शरदची भेट घेतली. शरद दाढी—स्नान आटोपून व कपडे चढवून तयार होता. तो बातमी ऐकण्यास अधीर बनला होता. झुंजारनें त्याला थोडक्यांत आनंदरावांबरोबरच्या मुलाखतीची बातमी सांगितली.

'तेव्हां तूं दडी मारून बसणेंच योग्य आहे.' झुंजार शेवटीं म्हणाला, 'उद्यां सकाळीं सर्व वर्तमानपत्रें रघुवीर तिरंदाजाला भरपूर प्रसिद्धि देतील. मी तुला फरारी होण्यास मदत केली असा आनंदरावांना संशय आहे पण त्यांच्याजवळ तसे सिद्ध करण्यास पुरावा नाहीं. तेव्हां सध्यां तरी आपली बाजू चांगली आहे.'

'याला तुम्हीं चांगली बाजू म्हणतां !' कपाळावर हात मारीत शरद म्हणाला, 'अरे देवा ! सर्व जगाला, माझ्या मित्रांना, कंपनीला आणि गेलीं आठ—नऊ वर्षें माझ्याकडे आनंदानें पहाणाऱ्या सर्वांनाच तें समजेल. ज्यासाठीं मीं इतके कष्ट केले तें सर्वच मातीला मिळणार आहे !'

'पण शेवटीं तुझा जय झाल्यानंतर तें सर्व जग तुला डोक्यावर घेऊन नाचणार आहे !' झुंजार म्हणाला, 'आतां तुला न्याहारी मिळणार नाहीं.

नात्यानें भेटावयास जाणें हा कांहीं गुन्हा नाहीं. माझा मित्र रघुवीर तिर
दाज आहे हें समजल्यामुळें मला आश्चर्य वाटतें. विजू, तुला तें प्रकरा
आ5वत असेलच ...'

'झुंजार, तें पुरें झालें !' आनंदराव वैतागानें म्हणाले, 'मी तुला बटा
करीत नाहीं. पण तुला जें कांहीं माहीत असेल तें तूं मला सांगितलें पाहिजे

'तुम्ही असें प्रेमानें बोलूं लागलांत कीं मला फार आवडतां.' झुंजा
हंसून म्हणाला, 'मला जें माहीत आहे तें सर्व आणि सत्य तुम्हांला सांगेन
त्यामुळें मी धुतल्या तांदळाप्रमाणें निर्मळ आहें हें तुम्हांला पटेल. गेल्य
रात्री मी व विजू झोंपण्याच्या तयारींत असतांना आबासाहेबांचा टेलिफो
आला. आपल्या मुलीचा एका खुनी इसमाबरोबर विवाह झाला असें त्यांनं
सांगितलें.'

'त्यांनीं तुला तें टेलिफोनवरून सांगितलें ?' त्याच्याकडे रोंखून पहात
आनंदरावांनीं विचारलें.

'होय, आपणांला ती गोष्ट दुपारीं समजली असें ते म्हणाले.'

'यांतील एका शब्दावरहि माझा विश्वास बसत नाहीं.' आनंदरा
म्हणाले, 'दुनियेंतील कोणताहि माणूस असली गोष्ट टेलिफोनवरू
सांगणार नाहीं.'

'ठीक आहे. तुम्हांला आतां मी सत्यच सांगतों.' झुंजार म्हणाला
'त्यांनीं टेलिफोन करून मला बोलाविलें आणि मीं त्यांची 'गरूड–भरारी
तील बैठकीच्या खोलींत भेट घेतली. त्यांनीं त्यांच्या एका कामाकरितां मल
एक लक्ष रुपये देण्याची तयारी दाखविली.'

'एक लक्ष रुपये ! हें सत्य सांगतांना त्यांना दुपारींच झटका आल
होता ही गोष्ट तूं विसरला तर नाहींस ना ?' आनंदरावांनीं हेटाळणीं
विचारलें.

'तो झटका नव्हता. ती लबाडी होती.' झुंजार म्हणाला, 'त्यांचें का
अगदींच साधें होतें पण तें मला आवडलें नाहीं.'

'कोणतें काम ?' त्याच्याकडे संशयानें पहात आनंदरावांनीं विचारलें.

'शरदला ठार करायचें आणि तो अपघातांत ठार झाला असें भासवायचें
झुंजार म्हणाला, 'म्हाताऱ्याची कल्पना छान होती. पण आनंदराव, मं
भाडोत्री मारेकरी नाहीं हें तुम्हांला माहीतच आहे. म्हणून मी त्यांना कांही
थाप ठोकून तेथून निसटलों–'

'पुरें झालें ! मला तुझ्या आणखी थापा ऐकायच्या नाहींत !' आनं
राव चिडून म्हणाले, 'तू थोडें सहकार्य करशील अशी मला आशा वाट
होती. जर तू यांत भाग घेत असशील तर तुला पश्चात्ताप होईल हें आतां
बजावून ठेवतों. तो शरद महापातकी आहे आणि फरारी आहे आणि

कुठें आहे हें तुला माहीत असावें अशी माझी कल्पना आहे.'

'आनंदराव केवळ चर्चा म्हणून याकडे पहा.' झुंजार म्हणाला, 'जर शरद निरपराधी असला आणि कुणी त्याच्या गळ्याला फांस लावण्याचा प्रयत्न करीत असला तरीहि मीं त्यांत भाग घेऊं नये काय?'

'तो रघुवीर तिरंदाज आहे हें तूं ऐकलें नाहींस काय?'

'पण त्या रघुवीरलाहि कुणाच्या कारस्थानाला बळी पडावें लागलें असलें तर?' झुंजारनें विचारलें

'भलतेंच! झुंजार, लक्षांत ठेव! त्या फरारी माणसाला तूं मदत केलीस तर तुला ताबडतोब अटक करण्यांत येईल!'

'मी आबासाहेबांना भेटावयास गेलों तर तुमची कांहीं हरकत आहे काय?'

'तूं तेथें जाणार कशाला?' त्याच्याकडे संशयानें पहात आनंदरावांनीं विचारलें.

'त्यांच्या मुलीसाठीं. रात्रीची हकीकत समजली तर तिला भयंकर धक्का बसेल.' झुंजार म्हणाला, 'तिला ती गोष्ट हळुवारपणें सांगायला हवी.'

'तुला जायचेंच असलें तर मी अडवूं शकणार नाहीं.' आनंदराव नाखुषीनेंच म्हणाले, 'ती बातमी अद्याप तरी बाहेर आलेली नाहीं. तें स्थानिक पोलिसांचें काम आहे...'

'आनंदराव, माझी एक विनंति मान्य करा.' झुंजार म्हणाला, 'ती बातमी आणखी कांहीं वेळ बाहेर फोडूं नये असें तुम्ही टेलिफोन करून स्थानिक पोलिसांना कळवा. मला प्रथम 'गरुड भरारी'त जाऊं दे. त्या गोष्टीला अतिशय महत्त्व आहे.'

आनंदराव त्याच्याकडे टक लावून पहात संशयानें म्हणाले, 'तुझा डाव तरी काय आहे?'

## १० : पुन्हां गरुड-भरारी!

आनंदराव निघून गेल्यानंतर विजयेची चर्या गंभीर बनली होती.

'आनंदरावांची चेष्टा करणें ठीक आहे, पण या प्रकरणाला आतां गंभीर वळण लागलें आहे.' ती म्हणाली, 'जर तुम्हीं सावधगिरी बाळगिली नाहीं तर स्वतःच संकटांत सांपडणार आहांत.'

झुंजारचें बोलण्याकडे लक्ष दिसलें नाहीं. 'विजू, माझाच तर्क बरोबर होता.' तो म्हणाला, 'जर आपण शरदला त्यावेळीं बाहेर काढलें नसतें तर त्याचा अवतार संपलाच असता. त्या पाजी माणसानें टेलिफोन करून पोलिसांना माहिती दिली होती. त्यामुळें त्याच्याविरुद्ध कारस्थान रचण्यांत

हें सांगण्यासाठीं मी आलों होतों. आतां तितका वेळ नाहीं. मला लागलीच बाहेर पडलें पाहिजे. पण जर तूं येथील फडताळ उघडशील तर तुला कित्येक प्रकारचीं खाद्य-पेयें सांपडतील. त्यावर तूं एक वेळ भागवली पाहिजे.'

जरी शरदला खूप विचारायचें होतें तरी झुंजार थांबला नाहीं. तो वर गेला तेव्हां विजयेची प्रवासाची तयारी झाली होती. आठ वाजण्यापूर्वींच झुंजारची खास वेगवान मोटार झुंजार–महालांतून बाहेर पडली आणि अवघ्या वीस मिनिटांत ते आबासाहेबांच्या ' गरुड–भरारी ' जवळ पोहोंचले.

' विजू, या बाजूला ये.' ती पुढच्या दाराकडे जात असतांना तो तिचा हात धरून म्हणाला, ' आपण गेल्या रात्रीच्या मार्गानेंच प्रवेश करणें उत्तम. नोकर निष्कारण आपला मौल्यवान वेळ फुकट घालवायचे.'

त्यानें मोटारींतून खालीं उतरतांनाच बैठकीच्या खोलीची उघडी खिडकी पाहिली होती. ते खिडकींतूनच आंत गेले. आबासाहेब आपल्या आरामखुर्चीवर बसले होते. ती जोडी अगदीं जवळ जाईपर्यंत तेथें कुणी आहे हें त्यांना समजलें नव्हतें.

' अरे देवा ! ' ते उभे राहून समोर उभ्या असलेल्या पाहुण्यांची मुद्रा जवळून न्याहाळीत म्हणाले, ' झुंजार ! तुला वेड लागलें आहे काय ? आणि बरोबर कुणाला आणलेंस ? तुझें डोकें फिरलें आहे ? काय तुला मीं सूचना दिली असतांना तूं इतक्या उघडपणें यावेंस हा कमालीचा मूर्खपणा ...'

' तर मग आबासाहेब, तुम्हांला अद्याप समजलें नाहीं.' झुंजार मध्येंच पण समाधानानें म्हणाला.

' काय ? काय समजलें नाहीं ?'

' तुम्हांला अद्याप बातमी समजलेली नाहीं.' झुंजार म्हणाला, ' आबासाहेब, कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें कीं तुमची योजना सध्यां बारगळली.'

' कोणती योजना ?' रागानें ते म्हणाले, ' तूं काय बोलतोस तें मला समजत नाहीं. मी फार आजारी आहें.'

' असें ढोंग करूं नका आणि इतकें रागावूंहि नका.' झुंजार म्हणाला, ' ही माझी बायको आहे आणि तिला आपलें सर्व गुपित माहीत आहे.'

' तुझी बायको ! मला माहीत नव्हतें कीं–'

' मीं एक सभ्य, विवाहित माणूस आहें हें तुम्हांला माहीत नव्हतें, पण आयुष्य हें अनेक आश्चर्यांनीं भरलेलें असतें ! आतां तुम्हांला दुसरें आश्चर्य सांगतों. तुम्हीं गेल्या रात्रीं सुचविलेल्या योजनेची फयूजच उडाली. तुमचा तो अगदीं कोरा करकरीत जांवई गेल्या रात्रीं झालेल्या एका खुनाबद्दल पोलिसांना हवा आहे आणि तोच रघुवीर तिरंदाज आहे हें त्यांना समजलें आहे. आज दुपारीं वर्तमानपत्रांचे खास अंक बाहेर पडतील.'

आबासाहेब गरुडांच्या चर्येवर शुद्ध प्रेतकळा पसरली. त्यांना कांपरें भरलें.

कांहीं क्षण त्यांना बोलतांच येईना. झुंजारच्या कल्पनेपेक्षांहि त्यांना अधिक धक्का बसला होता.

'ईश्वरा, आतां तूंच मला वांचव!' ते म्हणाले, 'इतकी सावधगिरी बाळगूनहि सत्य बाहेर आलेंच तर! एका बदमाषाबरोबर—खुनी वेड्याबरोबर माझ्या मुलीचें लग्न झालें ही गोष्ट साऱ्या जगाला समजणार! त्यानें कुणाचा खून केला?'

'त्यानें खून केला असें मी म्हणालों नाहीं, पोलिसांना तो खुनाबद्दल हवा आहे असें मी म्हणालों. तो गुन्हेगार आहे असें मला स्वतःला वाटत नाहीं.' झुंजार जपूनच बोलत होता, 'मी येथें येण्याचें तेंहि एक कारण होतें...'

'अरे मूर्खा!' अतिशय संतापून आबासाहेब ओरडले, 'तूं नालायक गाढव आहेस! जर मीं सांगितल्याप्रमाणें तूं ताबडतोब वागला असतास तर त्या तरुण सैतानाला असें कांहीं करण्याची संधीच मिळाली नसती...'

'जरा तुमचें घोडें आंवरा.' झुंजार म्हणाला, 'जरी मीं तुमचें तें घातकी काम पत्करलें असतें तरी कांहीं करूं शकलों नसतों. खुनी माणसानें फार त्वरेनें हालचाल केली. त्याला शरदचें रहस्य माहीत होतें आणि पूर्वी रघुवीरला ज्या गुन्ह्याबद्दल शिक्षा झाली होती त्याचीच हुबेहूब नक्कल करून त्यानें शरद पकडला जावा अशी व्यवस्था केली.'

'नाहीं! तें अशक्य आहे!' आबासाहेब म्हणाले.

'कुणालातरी कालच शरद हाच रघुवीर तिरंदाज आहे हें समजलें व त्यानें घाबरून त्वरित हालचाल केल्यामुळें तुमच्या मूळ योजनेचा फडशा उडाला.'

आबासाहेब गरुड एखाद्या पुतळ्याप्रमाणें स्तब्ध बसले होते. ते एकाएकीं म्हणाले, 'हा फार मोठा आघात आहे! कुणातरी रहस्यमय माणसाची हालचाल वगैरे मला पटत नाहीं. त्यानेंच तो खून केला. कोण ठार झालें? ती तरुणी आहे काय?'

'होय, पण...'

'सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे.' आबासाहेब मध्येंच म्हणाले, 'तें त्याचेंच काम आहे. झुंजार, त्या टेबलावरील घंटी वाजव. ही गोष्ट ताबडतोब माझ्या मुलीला कळविली पाहिजे.'

'आबासाहेब, घंटी वाजविण्यापूर्वी क्षणभर थांबा' झुंजार म्हणाला, 'शरदचें रहस्य कालच कुणाला समजलें असावें याचा तुम्ही कांहीं तर्क करूं शकता काय?'

'नाहीं. याच खोलींत फक्त आम्हां दोघांचेंच बोलणें झालें होतें. झुंजार, मस्करपणा करूं नकोस. हें त्याचेंच काम आहे. घंटीचें बटण दाब!'

झुंजारनें बटण दाबतांच नोकर धांवतच तेथें आला. झुंजार—बिजयेला

पाहून त्याला आश्चर्य वाटलें पण आबासाहेबांनीं त्याला विलासिनीला बोल-विण्यासाठीं लागलीच पिटाळलें. एका मिनिटानंतर विलासिनी तेथें आली. तिच्याबरोबर रामलालहि होता. दोघांच्याहि मुद्रा चिंताक्रांत दिसत होत्या.

'बाबा, तुमची प्रकृति जास्त बिघडली काय?' ती त्यांच्या खुर्चीकडे धांव घेत म्हणाली. नंतर झुंजार–विजयेला पाहून बुचकळ्यांत पडली. 'इथें काय चाललें आहे? तुम्ही मुळींच आजारी दिसत नाहीं.'

'मी आजारी नाहींच!' ते जोरांत म्हणाले, 'ती बतावणी होती. मीं मानकरांना माझ्या बाजूला वळविलें होतें. पोरी, तुझें लग्न एका खुनी माणसाबरोबर झालें आहे हें तुला समजलेलें बरें...'

'म्हणजे बिचारा शरद संकटांत सांपडला आहे हें तुम्हांला समजलें तें बरें.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'त्याच्यावर खुनाचा आरोप आहे, पण ती अगदीं वेगळी गोष्ट आहे. विजू, तूं तिला बाजूला घेऊन हळुवारपणें सांग.'

पण ती तसें करण्यापूर्वींच आबासाहेब कठोर स्वरांत म्हणाले, 'तो तसला तमाशा करण्यास आतां सवड नाहीं. मुली, तुझ्या त्या दिवट्या नव-ऱ्यानें एका तरुणीचा निर्दयतेनें खून केला आहे–'

'भलतेंच! त्यांच्या हातून तसली गोष्ट कधींच होणार नाहीं.' ती ठाम-पणें म्हणाली.

'तुझा नवरा हा रघुवीर तिरंदाज आहे–' आबासाहेब म्हणाले.

'तें मला गेल्या सहा महिन्यांपासून माहीत आहे.' ती शांतपणें म्हणाली, 'मला सर्व सत्य सांगितल्यानंतरच त्यांनीं माझ्याशीं लग्न केलें.'

'म्हणजे बारा वर्षांपूर्वीं खून करणारा माणूस तुला आवडला? तुझी कमाल झाली म्हणायची!' आबासाहेब ओरडून म्हणाले.

'मी त्यांना दोन वर्षें-निदान अठरा महिने चांगली ओळखतें.' ती म्हणाली, 'त्यानीं पूर्वींहि गुन्हा केला नव्हता आणि ते आतांहि करणें शक्य नाहीं.'

'पण त्यानें काल दुपारीं अगदीं याच ठिकाणीं आपण रघुवीर तिरंदाज आहोंत असें मोठ्या अभिमानानें मला सांगितलें.' आबासाहेब म्हणाले.

'अस्सें! म्हणून तुम्हीं आजारी पडण्याचें ढोंग करून आमच्या विवाहाचा विचका उडविलात! त्यांनीं ती गोष्ट तुम्हांला अभिमानानें सांगितली यावर माझा विश्वास नाहीं.'

झुंजारला ती झटापट आवडली होती. विलासिनी बहाद्दर होती!

'तूं विश्वास ठेव अगर ठेवूं नकोस.' आबासाहेब म्हणाले, 'त्यानें आणखी एक भयंकर खून केला हें सत्य आहे.'

'तें अजिबात असत्य आहे!' ती जोरांत म्हणाली व नंतर रागानें झुंजारकडे वळली, 'तुम्हीं ही खोटी बातमी बाबांना सांगितली काय?'

'विलासिनीताई, मी तर तुझ्या बाजूचा आहें.' झुंजार लागलीच म्हणाला, 'तुझें बोलणें ऐकून मला फार आनंद झाला. मी योग्य तेंच करीत आहें याबद्दल आतां माझें पूर्ण समाधान झालें.'

तिनें आश्चर्यानें व बुचकळ्यांत पडून त्याच्याकडे पाहिलें. 'तुम्ही कोण ?' तिनें विचारलें, 'तुम्ही इथें आलांतच कसे ?'

'मीसुद्धां त्याच गोष्टीचा विचार करीत आहें.' रामलाल म्हणाला.

झुंजार उत्तर देण्यापूर्वीच आबासाहेब अधिऱ्या स्वरांत म्हणाले, 'हे झुंजारराव व त्यांची बायको शरदचे मित्र आहेत. त्यांना ती गोष्ट समजतांच, विलास–ते केवळ तुझ्यासाठीं येथें धांवत आले. पोलीस ती बातमी अचानक सांगतील आणि तुला धक्का बसेल अशी त्यांना भीति वाटली.'

'अस्सें ! पण बाबा, ती बातमी सांगण्यांत तुम्हीं पोलिसांवरहि ताण केलीत !' ती म्हणाली, 'इतक्या निर्दयतेनें ती बातमी सांगणें इतर कुणालाहि जमलें नसतें, पण त्यामुळें कांहींच फरक पडणार नाहीं. शरदच्या विरुद्ध कुणीं कांहींहि सांगितलें तरी त्यावर माझा विश्वासच बसणार नाहीं.'

'जेव्हां तूं सविस्तर हकीकत ऐकशील तेव्हां तुझें मन खात्रीनें बदलेल.' तिचे वडील रागानें म्हणाले, 'एका मुलीचा अगदीं बारा वर्षांपूर्वींप्रमाणेंच निर्दयतेनें खून झाला आहे आणि पोलीस त्याचा तपास करीत आहेत.'

'कोणती मुलगी ? आणि यांचा संशय कां घेण्यांत आला ?' तिनें विचारलें.

'त्यानें काल दुपारीं भलतेंच बोलावें ही मोठीच दुर्दैवाची गोष्ट आहे.' अभ्यासू चर्येचा रामलाल शांतपणें म्हणाला, 'आतां हें सर्व घराण्याच्या दृष्टीनें वाईट आहे. ही गोष्ट आतां लपवितां येणार नाहीं. तो कुणाचा खून करील असें मलाहि वाटत नाहीं.'

रामलाल ते वेळेवर बोलला असें झुंजारला वाटलें. त्यामुळें त्याला काय बोलावयाचें तें ठरविण्याची संधि मिळाली.

'विलासिनीताई, पोलिसांनीं शरदचा संशय घ्यावा याला तसेंच कारण आहे !' तो म्हणाला, 'मी जें सांगतों तें मन घट्ट करून ऐक. गेल्या रात्रीं माटुंगा येथील शिवसदनांत खून झाला. तुझ्या मोलकरणीला–मंजूला ठार करण्यांत आलें.'

'अरे देवा !' ती घाबरून म्हणाली.

'खुनी माणूस तिच्या चांगल्या परिचयाचा असावा, नाहींतर तिनें त्याला घरांत घेतलें नसतें.' झुंजार पुढें म्हणाला, 'आणि बारा वर्षांपूर्वीं आनंदी मोरेला ठार करण्यांत आलें त्या प्रकाराची अगदीं हुबेहूब नक्कल करण्यांत आली होती. कुणींतरी पोलिसांना टेलिफोन करून प्रेत कुठें आहे तें व शरदच रघुवीर तिरंदाज आहे हें कळविलें. ते त्याच्या घरीं गेले तेव्हां त्यांना

तेथें स्नानगृहामध्यें रक्त पहावयास मिळालें, पण तो पोलिसांना सांपडला नाहीं. कुणींतरी त्याच्याविरुद्ध जबरदस्त कारस्थान रचलें आहे अशी माझी खात्री आहे.'

'पण बिचाऱ्या मंजूचा खून कां करण्यांत आला ?' विलासिनीनें विचारलें.

'कां तें मी तुला सांगतों.' आबासाहेब कठोर स्वरांत म्हणाले, 'तो रागावलेला माणूस तुझ्या घरीं गेला. मंजूला तेथें पाहून त्यानें तिच्यावर अत्याचार करण्याचा प्रयत्न केला. तिनें नकार देतांच त्यानें तिचा खून केला.'

'शक्यच नाहीं !' विलासिनी म्हणाली, 'हे गृहस्थ म्हणतात तेंच खरें. कुणींतरी त्यांच्याविरुद्ध कारस्थान रचलें आहे.'

'आतां ही चर्चा पुरे झाली.' आबासाहेब रागानें म्हणाले, 'झुंजारराव, तुम्ही तुमच्या बायकोला घेऊन जा. ही आमची घरगुती भानगड आहे.'

'इतकी घाई करूं नका.' झुंजारहि तितक्याच जोरानें म्हणाला, 'मला एक-दोन प्रश्न विचारायचे आहेत. तुमची मुलगी आणि मुलगा मला मदत करूं शकेल असें मला वाटतें.'

'मी ?' रामलालनें कांहींशा आश्चर्यानेंच विचारलें, 'मी तुम्हांला कांहींच मदत करूं शकणार नाहीं अशी भीति वाटते. मात्र मदत करण्याची माझी इच्छा आहे. कारण तुमच्याप्रमाणेंच माझेंहि मत आहे.'

विलासिनी विचार करीत होती. ती एकाएकीं आपल्या बापाकडे रागानें पहात म्हणाली, 'त्यांनीं मला दिलेलें वचन मोडून काल दुपारीं तुम्हांला तें कां सांगितलें तें आतां माझ्या लक्षांत आलें. अनेक वर्षें ते तुमच्या नांवानें मनांतून जळफळत होते. त्यांच्यावर अन्याय झाला होता व त्यामुळें त्यांच्या आईनें व वडिलांनीं प्राण सोडले होते. नंतर तुमचें माझ्यावर मुळींच प्रेम नाहीं हें त्यांनीं ओळखलें व त्यामुळेंच त्यांना तुमची एकदां तरी हजेरी घ्यावी असें वाटलें ...'

'गप्प बैस !' आबासाहेबांनीं रागानें गर्जना केली.

ती रागानें उलट जबाब देणार असें क्षणभर दिसलें. नंतर अनपेक्षितपणें ती विजयेला बिलगली व तिनें हुंदके देण्यास सुरुवात केली.

'विजू, तिला सांभाळ. रडल्यामुळें तिचें हृदय हलकें होईल.' झुंजार म्हणाला आणि तो रामलालकडे वळला, 'तुम्हांला सुधाकराची माहिती आहे काय ?'

'सुधाकर ? मला हें समजत नाहीं.' आपल्या मोठ्या चष्म्यांतून झुंजार-कडे पहात रामलाल म्हणाला, 'सुधाकराचा या प्रकाराशीं काय संबंध ?'

'कदाचित असेलहि. मी माहिती गोळा करीत आहें.' झुंजार म्हणाला, 'तुम्हांला त्याच्याबद्दल काय माहीत आहे ?'

'मला तो आवडत नाहीं. मी त्याचा तिरस्कार करतों.' रामलालनें

सरळ सांगितलें, ' विलास त्याला आपला मित्र कां मानते तेंच मला समजत नाहीं. पण तिचें वागणेंच वेगळें आहे. तिच्याबरोबरच मी एकदां त्याच्या घरीं गेलों होतों. तो सारखा भरपूर दारू पितो तें मला आवडत नाहीं. तो चांगल्या घराण्यांतील आहे. बापाकडून भरपूर पैसे मिळाले आहेत. तो माणूस केवळ चैनींत आयुष्य घालवीत असतो.'

' तुम्ही त्याच्या घरीं गेलां होतां तर मला त्याचा पत्ता सांगाल काय ?'

' होय ...' आठवण करीत रामलाल म्हणाला, ' गिरिजा भुवन, मरीन लाइन्स, रीगल थिएटरला लागूनच ती इमारत आहे. पण सुधाकराचा या गोष्टीशीं काय संबंध ?'

' सुधाकर ?' आपलें अश्रूंनीं भिजलेलें तोंड विजयेच्या कुशींतून बाहेर काढीत विलासिनीनें विचारलें, ' तो काल येथें होता आणि खूप दारू प्याला होता.'

' पण तुम्हीं त्याला या खोलींत बंद केलें होतें काय ?'

' होय, तें खरें आहे.' ती त्याच्याकडे आश्चर्यानें पहात म्हणाली, ' मीं दार बाहेरून किल्लीनें बंद केलें होतें.'

' आणि त्यानंतर तुझे वडील शरदला घेऊन याच खोलींत आले.' झुंजार म्हणाला, ' त्यावेळीं तो येथें लपला होता आणि त्यामुळेंच शरद हाच रघुवीर तिरंदाज आहे हें त्याला समजलें.'

' अरेच्चा !' ती विस्फारित नजरेनें म्हणाली.

' शरदचें रहस्य, तुझे वडील सोडल्यास फक्त त्यालाच समजलें होतें. तो तुझ्यावर प्रेम करीत होता आणि शरदचा द्वेष करीत होता. शरदवर सूड उगविण्याची संधि त्याला अचानक मिळाली होती ...'

' झुंजार, यांत कांहीं अर्थ नाहीं आणि तें तुलाहि माहीत आहे.' आबासाहेब तिरस्कारानें म्हणाले, ' सुधाकराला सूड उगवायचा असता तर त्यानें ती बातमी पोलिसांना कळविली असती. तो खून करण्याच्या भानगडींत पडला नसता. बाहेर पोलीस आले असणार. शरद कुठें आहे हें तुला माहीत असलें तर ती माहिती पोलिसांना देणें तुझें कर्तव्य आहे.'

' पण मला तें माहीत नाहीं.' झुंजार म्हणाला आणि त्यानें विलासिनीकडे पाहून डोळा मिचकावला. ' नमस्ते आबासाहेब.'

तो खिडकींतून विजयेसह बाहेर पडला आणि त्यांच्यामागून विलासिनीनें उडी घेतली. कांहीं अंतरावर गेल्यानंतर तिनें विचारलें, ' झुंजारराव, मघां तुम्हीं माझ्याकडे पाहून डोळा मिचकावला त्याचा अर्थ काय ?'

' तूं आतां जें केलेंस तें करावेंस अशीच माझी इच्छा होती.' तो म्हणाला, ' विलासिनी, शरद अगदीं सुरक्षित आहे हें मला सांगावयाचें होतें. पण ही

माहिती फक्त तुझ्याकरितांच आहे.'

तिनें आश्चर्यानें व आदरानें त्याच्याकडे पाहिलें. 'ते सुरक्षित आहेत हें तुम्हांला कसें समजलें ?' तिनें विचारलें

'कारण मींच त्याला एका सुरक्षित ठिकाणीं ठेवलें आहे.' झुंजार म्हणाला, 'पण कुठें तें मी तुलाहि सांगणार नाहीं. तो संकटांत आहे आणि त्याला बऱ्याच मदतीची आवश्यकता आहे. आणि विलास, मी त्याला मदत करणार आहें.'

'पण तुम्ही कशी मदत करणार ?' तिनें विचारलें, 'तुम्ही कोण आणि कां मदत करणार आहांत ? तुम्ही त्याचे मित्र असतां तर यापूर्वीं माझी आणि तुमची खात्रीनें ओळख झाली असती.'

'आमची गेल्या रात्रींच ओळख झाली. मी कोण आहें तें तूं तुझ्या वडिलांना विचारलेंस तर माझा सर्व इतिहास तुला समजेल. पण त्यांनीं कांहीं वाईट सांगितलें तर त्यावर विश्वास ठेवूं नकोस.' झुंजार म्हणाला, 'शरदनें तुझ्या मोलकरणीचा इतकेंच नव्हे तर आनंदी मोरेचाहि खून केला नाहीं अशी माझी खात्री पटली आहे.'

'पण तुम्ही त्यांना कशी ...'

'कशी मदत करणार ?' झुंजारनें हंसून विचारलें, 'सोपें आहे. खऱ्या खुन्याला पकडलें कीं झालें. तूं मुळींच चिंता करूं नकोस सर्व कांहीं माझ्यावर सोंपव !'

## ११ : झुंजारवर मात ?

'सर्व कांहीं माझ्यावर सोंपव.' मोटार सुरू झाल्यानंतर विजयेनें झुंजारच्या आवाजाची नक्कल केली, 'बाकी तुमची हिंमत आहे खरी ! खऱ्या खुनी माणसाला पकडलें कीं झालें असें त्या गरीब मुलीला सांगणें सोपें होतें. पण तुम्ही हा जादूचा चमत्कार कसा करणार आहांत ?'

'पण विजू, तिला कांहींतरी सांगायला हवें होतें ना ?' झुंजार म्हणाला, 'शरदच्या वतीनें जोराची खटपट करण्यांत येत आहे अशी आशा तिला दाखवायलाच हवी होती. नाहींतर ती त्या अंधारकोठडींत निराशेनें प्राण सोडायची. मी तिला पैजेनें सांगतों कीं याच वेळीं स्थानिक पोलीस शरद भयंकर गुन्हेगार आहे व त्याच्या नांवानें स्नान करणें बरें असें तिला सांगत असतील.'

'ते तिच्यावर नजर ठेवतील.' विजया विचार करीत म्हणाली, 'मला वाटतें, म्हणूनच तुम्हीं तिला शरद कुठें आहे तें सांगितलें नाहीं. ती त्याला भेटायला धांव घेईल आणि पोलीस तिचा पाठलाग करतील अशी तुम्हांला भीति वाटली. एका अर्थीं तुम्हीं तें योग्यच केलें. पण तुम्हांला पहातांक्षणींच

ती तुमच्यावर खूष झाली होती. हें तुम्ही कसें करतां ? मलासुद्धां तुम्हीं असेंच फसविलें होतें. म्हणून तर पोरीचा संबंध असला कीं तुम्हांला एकटें जाऊं देण्यास मी तयार नसतें.'

'अग, मी त्याच्याकडे पाहून नुसते हंसतों. दुसरें कांहींच करीत नाहीं.' तो हंसून म्हणाला, 'पण जाऊं दे. मी तुला वाटतें त्याप्रकारें तिच्यावर खूष झालेलों नाहीं. आपणांला एका महाधूर्त खुनी माणसाबरोबर लढायचें आहे. त्यामुळें फार जपून पाऊल टाकलें पाहिजे. तो आतां माझ्यावरच हल्ला चढविण्याचा संभव आहे.'

झुंजार–महालांत पोहोंचतांच त्यानें शरदची भेट घेतली. तो तरुण सांपळ्यांत अडकलेल्या वाघाप्रमाणें त्या जागेंत फेऱ्या घालीत होता. झुंजारनें गरुड भरारीत काय घडलें तें सांगितलें, पण त्यामुळें शरदची चिंता कमी झाली नव्हती. दुपारचीं वर्तमानपत्रें झुंजारनें विकत घेतलीं होतीं. त्यांत पहिल्याच पानावर शरदचा फोटो होता व वर मोठा मथळा होता. 'नवरदेव खुनी आहेत !'

'झुंजारराव, तुम्ही इतके शांत कां तें मी ओळखतों.' शरद म्हणाला, 'माझा अवतार संपला आहे. मी रघुवीर तिरंदाज आहें हें जगाला समजलें आहे. पण असें लपण्यांत काय अर्थ आहे ? ते आज ना उद्यां मला पकडणारच. त्यामुळें तुम्ही मात्र संकटांत अडकाल...'

'तें जाऊं दे. मला पोलिसांबरोबर, विशेषत: आनंदरावांबरोबर लपालपीचा खेळ खेळणें आवडतें.' झुंजार हंसून म्हणाला, 'शिवाय तुला वाटतें तितकी परिस्थिति वाईट नाहीं. मंजूचा खुनी आतां घाबरला असणार. या पुढें तो अधिक हुषारी दाखविण्याचा प्रयत्न करील आणि घसरेल आणि त्यावेळीं मी त्याची मानगूट पकडीन. केवळ मंजूच्याच नव्हे तर आनंदी मोरेच्या खुनाचाहि आळ दूर होईल आणि तुला तुझ्या नांवानें उजळ माथ्यानें जगतां येईल.'

'झुंजारराव, पण हें शक्य आहे काय ?' त्यानें उत्सुकतेनें विचारलें, 'तो सैतान तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें खरोखरच चूक करील काय ?'

'सर्वच बदमाष माझ्याशीं गांठ पडल्यानंतर घोडचुका करतात.' झुंजार आत्मविश्वासानें म्हणाला, 'तूं कांहीं वेळ धीर धर !'

पण वर आल्यानंतर झुंजारला तितकासा आत्मविश्वास वाटत नव्हता. 'विजू, मीं त्याचें तात्पुरतें समाधान केलें आहे. पण काम कठीणच आहे.' झुंजार सिगारेट पेटवीत म्हणाला, 'खुनी माणूस कांहीं चूक करील यावर आपली सारी भिस्त आहे पण त्यानें चूक केली नाहीं तर ?'

'मीसुद्धां तोच विचार करीत आहें.' ती म्हणाली, 'सुधाकर हेंच या कोड्याचें उत्तर असावें असें तुम्हांला वाटतें काय ?'

'खरें सांगायचें तर, माझी तशी खात्री नाहीं.' झुंजारनें कबुली दिली, 'पण मी त्याला भेटणार आहें. तो जर अपराधी नसला तर तें मला समजेल ...'

त्यावेळीं टलिफोनची घंटा वाजली. रामलालनें टेलिफोन केला होता. 'झुंजारराव फार महत्त्वाचें काम आहे. मला तुमच्याशीं खाजगी बोलायचें आहे.' तो म्हणाला आणि झुंजारनें रिसींव्हरवर हात दाबून कोण बोलत आहे तें विजयेला सांगितलें, 'मी तुमच्या घरीं येऊं शकणार नाहीं. तुम्ही एखादी जागा सुचवूं शकाल काय ? मला कांहीं सांगायचें आहे व तें मी बाबा आणि विलासिनीसमोर सांगूं शकलों नाहीं.'

'तुम्ही कुठें आहांत ?' झुंजारनें विचारलें.

'मी धोबीतलावावरून बोलत आहें. तुमच्या मागोमागच मी मोटारीनें निघालों. तें माझ्या वडिलांना किंवा बहिणीला माहीत नाहीं. तुम्ही बिचाऱ्या शरदला मदत करीत आहां, तेव्हां तें तुम्हांला समजलेंच पाहिजे.'

'पण तुम्हांला येथें येण्यास कांहींच हरकत नाहीं. तुम्ही असें करा, वसंतराव जाधव हें नांव धारण करा.'

'तें ठीक, पण कोणत्याहि क्षणीं तुमचें नांव या प्रकरणाशीं जोडण्यांत येईल. त्यामुळें मला तो धोका पत्करायचा नाहीं.' रामलाल म्हणाला, 'आपण हॉटेलांत भेटणेंहि धोक्याचें आहे. कुठें एखादी रिकामी जागा असली...'

'ही तुमची सूचना वाईट नाहीं.' झुंजार म्हणाला, 'तुम्ही असें करा, आमच्या इमारतींत पांचव्या मजल्यावरील पांचशें दोन नंबरचा छोटा फ्लॅट रिकामा आहे. तुम्हांला तो तळमजल्यावर चौकशी केल्यास पहावयास मिळेल. तो दाखविण्यांत आल्यानंतर कांहीं निमित्तानें तुम्ही तेथेंच थांबा. मी आतांपासून बरोबर अर्ध्या तासानें तेथें येईन. म्हणजे तुम्हांला भरपूर वेळ मिळेल. नांव वसंतराव जाधव असें सांगा.'

त्यानें तें कबूल केल्यानंतर झुंजारनें रिसीव्हर खालीं ठेवला. 'भाई रामलालची ही काय गडबड आहे तें समजत नाहीं, पण तो इतकी सावधगिरी बाळगीत आहे तेव्हां त्याला कांहीं महत्त्वाचेंच सांगावयाचें असणार. निदान त्याला तरी तें महत्त्वाचें वाटत असावें.'

'आणि समजा, तोच खुनी असला तर ?' विजयेनें विचारलें.

'विजू, मला तुझ्या डोक्याचें नवल वाटतें' तिच्याकडे खेदानें पहात झुंजार म्हणाला, 'त्याला तो खून करण्याचें कारणच काय ?'

'आपल्या बहिणीचें खुनी तिरंदाजाबरोबर लग्न व्हावें हें त्याला पसंत नसलें तर ?' विजया म्हणाली, 'संशय घेण्यासारखें दुसरें कुणी नाहींच. निदान तुम्हीं कांहीं सावधगिरी बाळगिलीत तर बिघडणार नाहीं.'

'तूं आतां तुझ्या खोलींत जाऊन कांहीं वेळ विश्रांति घेशील तर माझ्या-वर मोठेच उपकार होतील.' झुंजार म्हणाला, 'आणि हें बघ, वेळ घालवि-ण्यासाठीं एखादी रहस्यकथा वाचूं नकोस, नाहींतर तुला आणखी भयंकर कल्पना सुचतील.'

त्यानें तळमजल्यावरील ऑफिसला टेलिफोन केला आणि आपल्या मॅनेज-राला वसंत जाधवबद्दल कांहीं सूचना दिल्या.

विजयेच्या डोक्यांतील वेड नाहींसें झालें नव्हतें. 'शरद हा तिरंदाज आहे ही गोष्ट आबासाहेबांनीं फक्त रामलालाच कळविली असावी. आपणांला कांहीं अत्यंत महत्त्वाचें आणि खाजगी सांगावयाचें आहे ही रामलालची मागणी मला संशयास्पद वाटते. त्याला तें गरुड भरारींतच सांगतां आलें असतें.

'त्याला तें आपल्या बहिणीच्या आणि वडिलांच्या देखत सांगावयाचें नव्हतें हें कारण पटण्यासारखें नाहीं.' ती म्हणाली, 'त्याला तुम्हांला बाजूला घेऊन पण... आबासाहेबांचें तुमच्याबद्दलचें वाईट मत पाहून त्यानें तसें केलें नसेल–'

'तुला शेवटीं शहाणपणा सुचला याचा मला आनंद होतो.' झुंजार म्हणाला.

ठरलेल्या वेळीं खाजगी लिफ्टनें झुंजार पांचव्या मजल्यावर गेला. झुंजार त्यावेळीं पूर्ण बेसावधच होता. पण तो सावध असता तरी फारसा फरक पडला नसता... खुनी माणसानें विद्युत्‌गतीनें आणि यंत्राच्या सफाईनें आपलें काम साधलें होतें.

झुंजारनें दारावर टिचक्या वाजविल्या. कांहीं सेकंदांतच दार उघडलें गेलें आणि झुंजारला रामलाल दिसण्याऐवजीं अर्ध क्षण ब्लँकेट दिसलें. दुसऱ्या अर्ध्या क्षणांत तें झुंजारच्या डोक्याभोंवतीं गुंडाळण्यांत आलें. त्याचे दोन्ही हात त्याच्या शरीराशीं अत्यंत निर्दयतेनें जखडण्यांत आले. कांहीं सेकंदातच हें घडलें...

त्याला पुढें खेंचण्यांत आलें व मध्यें पाय घालून आडवें पाडण्यांत आलें. त्याचवेळीं दार बंद होण्याचा आवाज झाला. त्या ब्लँकेटला आधींच फांस जोडण्यांत आला होता. त्यामुळें दोरी खेंचतांच त्याचें डोकें गुरफटलें गेलें होतें.

एव्हढा मोठा पराक्रमी झुंजार! तो हालचाल केल्याशिवाय कसा राहील? त्यानें पाय झाडले. आपले हात सोडविण्याचा प्रयत्न केला, पण त्यामुळें त्याला जखडणारी दोरी अधिकच पायांत रुतून त्याला जास्त वेदना मात्र झाल्या. नंतर त्याचे पायहि तितक्याच सफाईनें बांधण्यांत आले. नंतर त्याला उचल-ण्यांत आलें व जेव्हां त्याचें डोकें थंड पाण्यांत बुडविण्यांत आलें तेव्हां तो

मनांतून चरकला.

त्याला बाथरूममधील स्नानाच्या संगमरवरी हौदांत टाकण्यांत आलें होतें !

खून करण्याची ती साधी पण सैतानी युक्ति होती. त्याचे पाय दोरीनें समोरच्या एका हुकालाहि अडकविण्यांत आले होते.

झुंजारचें मस्तक दीड फूट पाण्यांत बुडालें होतें व तो त्या अरुंद जागेंत जराहि हलूं शकत नव्हता आणि पाय समोरच्या हुकाला ताणून बांधले होते पराक्रमी झुंजारची या ठिकाणीं कांहींच मात्रा चालत नव्हती. त्या गरम ब्लँकेटमधून पाणी आंत झिरपत होतें....

केवळ प्रबळ आत्मशक्तीच्या जोरावर झुंजार अगदीं शांत राहिला. तो एकटाच होता. मदतीची शक्यता नव्हती. विजयेची त्यानें चेष्टा केली होती. ती चिडली होती आणि वेळेवर खालीं येणार नव्हती आणि नंतर फार उशीर होणार होता !

पण विजया स्वस्थ बसली नव्हती. ती चिडली होती, पण ती आपल्या नवऱ्याला दुनियेंतील महामूर्खहि समजणारी होती. झुंजार तेथून बाहेर पडल्यानंतर ती फक्त पांच मिनिटेंच थांबली आणि लिफ्टकडे धांवली. ती पांचव्या मजल्यावर पोहोंचली आणि तिला अगदीं दूरच्या कोंपऱ्याकडे वळणारा माणूस दिसला. त्याच्या अंगावर रेनकोट होता आणि डोक्यावर फेल्ट–हॅट होती. तिला फक्त त्याची पाठ दिसली होती. पण लिफ्ट मध्यें असतांना तो माणूस टोंकाला असलेल्या जिन्याकडे कां जावा ?

तिनें त्या पांचशें दोन नंबरच्या जागेचें दार उघडलें. आंत एकदम शांत होतें. फक्त नळाच्या पाण्याचा आवाज होत होता. हा काय प्रकार ? तेथें झुंजार आणि रामलाल असायला हवे होते. ती स्नानगृहांत धांवली आणि जेव्हां तिनें तें समोरचें दृश्य पाहिलें तेव्हां ती भयंकर घाबरली.

पण तिनें एक क्षणहि फुकट घालविला नाहीं. तिनें आजूबाजूवरून नजर फिरविली आणि तिला एका टेबलावर ब्लेड सांपडली. पूर्वीच्या बिऱ्हाड-करूनें ती तेथें टाकली असावी. तिनें प्रथम पायाच्या दोऱ्या कापल्या आणि ते वर लोंबकळणारे पाय त्या टबमध्यें आपटले. नंतर तिनें दोन्ही हातांनीं ब्लँकेट धरून झुंजारचें डोकें पाण्याबाहेर काढलें.

'शाबास विजू !' त्या ब्लँकेटमधून गुदमरलेला–चमत्कारिक आवाज निघाला, 'अर्थात तूंच असणार !'

'मला वाटलें कीं तुम्ही जिवंत नसणार !' ती धांपा टाकीत म्हणाली.

तिनें त्या ब्लेडनें पण अधिक सावधगिरीनें तें ब्लँकेट फाडलें आणि झुंजारचें भिजलेलें डोकें बाहेर निघालें. त्याला श्वासोच्छ्वास करणें जड जात होतें.

'माफ कर विजू.' तो अगदीं थकलेल्या स्वरांत म्हणाला, 'मीं तीन तास श्वास रोखण्याचा प्रयत्न केला.'

'पण हें घडलें कसें? मी ताबडतोबच खालीं आलें. कां आलें तें समजत नाहीं. पण मीं तुम्हांला सांगितलें नव्हतें का...'

'विजू, तूं आतां हवें तितकें टोचून बोल.' तो मध्येंच म्हणाला, 'या बाथ-टबमध्यें अर्धा दिवस अडकलों होतों. असें वाटतें...अरे देवा! विजू, यानंतर मी पुन्हां कधींच तुझी चेष्टा करणार नाहीं.'

तो तिच्या मदतीनें त्या टबमधून बाहेर पडला. अद्याप त्याच्या गळ्यांत तें ब्लँकेट अडकलें होतें. त्याचे हात त्याच्या अंगाभोंवतीं बांधलेले होते. वेळ गंभीर होती म्हणून, नाहींतर तें दृश्य मोठें हास्यास्पदच होतें!

विजयेनें त्याच्या हाताची अवस्था पाहिली. ब्लेडनें दोऱ्या कापल्यानंतर तें ब्लँकेट खालीं पडलें आणि अश्रूभरल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे पहात तिनें त्याला घट्ट मिठी मारली.

'मी येथें वेळेवर आलें ही ईश्वराची कृपाच म्हणावयाची!' ती सद्-गदित कंठानें म्हणाली.

'आतां माझ्या लक्षांत आलें!' झुंजार म्हणाला, 'त्यानें नायलॉनच्या दोऱ्यांचा उपयोग केला होता!'

'पण किती माणसांनीं तुमच्यावर हल्ला केला? सात–आठजण तरी असायला हवेत. त्यांनीं एकदम हल्ला चढविला असणार...'

'माफ कर विजू, माणूस एकच होता.' झुंजार लाचारीनें म्हणाला, 'पण जाऊं दे. यापुढें मीं कधीं वाह्यातपणा केला तर फक्त 'बाथरूम' एव्हढेच शब्द माझ्या कानांत उच्चारलेस कीं मी गोगलगाईइतका नरम होईन. त्या आपल्या ब्लँकेटनें माझे प्राण वांचविले. झुंजार महालांतील सर्व वस्तु पहिल्या दर्जाच्या असतात. ब्लँकेट उत्कृष्ट लोकरीचें असल्यामुळें आंत पाणी शिरलें नव्हतें. पण चल, आधीं कपडे बदललें पाहिजेत. तूंहि निष्का-रण मला मिठी मारून तुझी चांगली साडी भिजविली आहेस...'

'पण आतां तरी तो अगदीं निरुपद्रवी दिसणारा रामलाल खुनी आहे अशी तुमची खात्री पटली ना?' विजयेनें विचारलें.

'रामलाल?' झुंजार विचार करीत म्हणाला, 'नाहीं. तोच असावा असें अद्यापहि मला वाटत नाहीं. टेलिफोन करणाऱ्यानें त्याच्या आवाजाची हुबेहूब नक्कल केली होती असा माझा तर्क आहे. त्या माणसाचें चापल्य, शक्ति, धूर्तता त्या रामलालशीं जुळणारी नाहीं.'

तीं पुन्हां वर गेलीं. त्यांनीं कपडे बदलले आणि तीं बैठकीच्या खोलीं-तील कोचावर बसलीं. झुंजारची मुद्रा विचारी दिसत होती. आतांपर्यंत विजया कांहींच बोलली नव्हती. पण वरून शांत दिसणारा झुंजार आंतून

ज्वालामुखीप्रमाणें तापला आहे हें तिला समजत होतें.

'त्या अनोळखी सैतानाला रामलालच्या आवाजाची चांगली माहिती होती.' ती म्हणाली. 'तेव्हां सुधाकर असेल काय ?'

'होय, पुन्हां हें सरळ त्याच्याकडेच जातें.' झुंजार म्हणाला.

'पण हल्ला करणारा रामलाल नव्हता अशी तुमची पूर्ण खात्री आहे ना ? त्याला तुम्हीं पाहिलें काय ?' तिनें विचारलें-'तो बोलला होता काय ?'

'मी त्याला पाहिलें नाहीं आणि तो बोललाहि नाहीं.'

'तर मग तो रामलालहि असेल. मीं एका माणसाला पाठमोरें पाहिलें. तो बांध्यानें रामलालसारखाच होता...'

'थांब, आपण खात्री करूं.' तो म्हणाला आणि त्यानें आबासाहेबांचा टेलिफोन नंबर फिरविला. त्याला ताबडतोब त्यांचा आवाज ऐकूं आला.

'झुंजार, तूं मला टेलिफोन करण्याचें कारण काय ?' ते रागानें म्हणाले, 'आपला संबंध संपला. तूं तुझा कांहीं वेळ मोडलास त्याबद्दल जर तुला पैसे हवे असले...'

'जरा थांबा. मला फक्त रामलालबरोबर बोलायचें आहे. तुमची हरकत नाहीं ना ?'

'माझी हरकत आहेच.' आबासाहेब ठांसून म्हणाले, 'पण त्या मूर्खाचें तुझ्याबद्दल कां कुणाला ठाऊक, चांगलें मत दिसतें. तेव्हां—अरे रामलाल, तो झुंजार तुझ्याशीं कांहीं बोलूं इच्छीत आहे.'

'झुंजारराव ! कांहीं नवीन आहे काय ?' रामलालचा आवाज ऐकूं आला, 'शरदचा शोध लागला नाहीं. झुंजार, कांहीं मदत होणार असली...'

'शरदचा शोध लागला नाहीं.' झुंजार विजयेकडे नेत्रकटाक्ष फेंकीत म्हणाला, 'रामलाला, मी तुम्हांला एवढेंच विचारणार होतों कीं मागें मुंबईंतील गोदींत मोठा स्फोट झाला होता त्यावेळीं सुधाकराला कांहीं दुखापत झाली होती काय ?'

'मला माहीत नाहीं.' रामलाल म्हणाला, 'पण त्याला कुठें गंभीर जखम झाली असावी असें दिसलें नाहीं.'

झुंजारनें आभार मानून रिसीव्हर खालीं ठेवला आणि विजया म्हणाली, 'रामलालनें तुमच्यावर हल्ला केला नाहीं असें सिद्ध झालें. त्याला इतक्या वेळांत गरूड-भरारी गांठतां आली नसती.'

'होय, त्याला एकाच वेळीं दोन ठिकाणीं हजर राहणें शक्य नाहीं.' झुंजार म्हणाला, 'पण माझ्यावर हल्ला झाला यावरून कुणीतरी अतिशय घाबरला आहे असेंच सिद्ध होतें. आणि घाबरलेल्या माणसाच्या हातून फार वाईट चुका होतात.'

'पण त्यानें तुमच्यावर हल्ला करावाच कां ?' तिनें विचारलें.

'कारण त्याला माझी भीति वाटते.' झुंजार लागलीच म्हणाला, 'तो मला वैयक्तिक ओळखत नसला तरी त्यानें माझ्याबद्दल खूप ऐकलें असावें. मी या प्रकरणांत भाग घेत आहें हें त्याला माहीत आहे आणि मी त्याला पकडीन अशी त्याला भीति वाटते. तेव्हां त्यानें मला नाहींसा करण्याचा अगदीं सोपा मार्ग शोधून काढला होता. आणि विजू, तूं जर जवळ नसतील तर तो त्याचा डाव साधलाहि असता.'

'तो महाघातकी आहे.' ती गंभीर स्वरांत म्हणाली, 'तो कदाचित दुसरा प्रयत्न करील.'

'करूं दे! तसें झालें तर उत्तमच!' झुंजार म्हणाला, 'पुढल्या खेपेला मी इतका निष्काळजी असणार नाहीं.'

'तुम्हीं रामलालला त्या स्फोटांत सुधाकर जखमी झाला होता काय, असें विचारलेंत त्यांत तुमचा काय हेतु होता? कीं त्याच्याशीं बोलण्याचें तुम्हांला कांहीं कारण हवें होतें?'

'माझा हेतु होताच. त्या बॉम्ब स्फोटांत सुधाकराला जखम झाली असती तर तो आनंदी मोरेच्या खुनाच्या वेळीं मांडवींत होता असें मानतां आलें असतें.' झुंजार म्हणाला, 'पण त्यामुळें माझ्या मनांत एक विचार आला आहे. मी आनंदरावांकडून ती माहिती मिळविण्याचा प्रयत्न करतों. स्फोटांत जखमी झालेल्यांची यादी त्यांच्याजवळ असेल.'

तो बोलत होता पण त्याबरोबर बाहेर पडण्याची तयारीहि करीत होता. तिनें चितायुक्त स्वरांत विचारलें, 'तुम्ही आतां कुठें जाणार आहांत?'

'मी त्या सुधाकराबरोबर गप्पागोष्टी करणार आहें.' तो म्हणाला.

'मला तें आवडत नाहीं.' ती म्हणाली, 'जर आपणांला हवा असलेला तोच माणूस असला तर तो मनुष्यभक्षक वाघापेक्षांहि धोकेबाज असणार. तुम्ही बरोबर दोन तरी पिस्तुलें घ्या. तुम्हीं दुपारपर्यंत तरी थांबायला हवें होतें. अर्ध्या तासापूर्वींच तुम्हांला तो भयंकर अनुभव आला—'

'त्या अनुभवामुळेंच मला भाई सुधाकराबरोबर बोलण्याची घाई आहे.' झुंजार म्हणाला— 'मला समोर पहातांच त्याची काय अवस्था होते तें मला पहावयाचें आहे. अद्याप आपली खात्री नाहीं. कदाचित तो अगदीं निरुपद्रवी असेल.'

'पण तो तसा नसला तर?' तिनें चितायुक्त स्वरांत विचारलें.

'विजू, तूं अशी केव्हांपासून घाबरायला लागलीस?' त्यानें तिची हनुवटी धरून तिची मान वर उचलीत विचारलें, 'मी दोन वेळां बेसावध सांपडेन काय? तुला इतकी भीति वाटत असली तर तूं माझ्याबरोबर चल. पण तुला बाहेर मोटारींत थांबावें लागेच. त्याला तसेंच कारण आहे.'

त्यांनीं पुन्हां शरदची भेट घेतली नाहीं. दुपारच्या भोजनाच्या वेळेपर्यंत

तो एकटाच राहिला तर बिघडणार नव्हतें. तीं विजयेच्या मोटारीनें सुधा-कराच्या घरीं गेलीं. झुंजारनें जोरानें दार ठोठावलें आणि तें सुधाकरानेंच उघडलें.

'आपण सुधाकर रेंदाळकर ?' झुंजारनें नम्रतेनेंच विचारलें.

'होय.' सुधाकर म्हणाला. त्याचे केंस विस्कळीत होते. चेहरा उतरलेला होता व डोळ्यांखालची जागा काळी पडली होती.

'माझें नांव सी. आय्. डी. सुपरिंटेंडेंट आनंदराव.' झुंजार अधिकारयुक्त स्वरांत म्हणाला, 'सुधाकर, जर तुमची हरकत नसली तर मला तुमच्याशीं थोडें बोलायचें आहे.'

## १२ : सुधाकर !

झुंजारला बाथ–टब्मध्यें कोंबणारा चतुर कारस्थानी सुधाकरच असला तर त्यानें झुंजारला पहातांच प्रथमदर्शनीं वाटणारें आश्चर्य दडविण्यांत यश मिळ-विलें होतें यांत शंका नव्हती. त्यानें दार उघडल्यानंतर झुंजारला न ओळखतांच त्याच्याकडे टक लावून पाहिलें होतें आणि जर तो अभिनय असला तर भारतांतील नामांकित नटांमध्यें त्याची गणना करायला हवी होती !

पाहुण्याचें नांव ऐकून तो अस्वस्थ झाला होता पण त्यानें हरकत घेतली नव्हती. 'या आंत.' तो नाखुषीनेंच म्हणाला, 'सी. आय्. डी. सुपरिंटेंडेंट ? तुम्ही मला भेटण्यासाठीं कां आलांत तें समजत नाहीं. पण त्या पाजी शरद-चीच कांहीं भानगड असावी. त्या हलकट माणसाचा मला नेहमींच संशय येत होता.'

त्यानें झुंजारला आंतल्या खोलींत नेलें आणि सुधाकर अभिनय करीत नाहीं अशी आतां त्याची अधिक खात्री पटली होती. तो थकलेला दिसत होता. तो खुर्चीवर बसला तेव्हां वेदना झाल्याप्रमाणें त्यानें तोंड वेडेंवांकडें केलें. सुधाकर रेंदाळकर कांहीं चांगल्या अवस्थेंत नव्हता.

'होय सुधाकर, मी तुम्हांला शरदबद्दलच कांहीं प्रश्न विचारणार आहें.' झुंजार पूर्वीच्याच अधिकारदर्शक आवाजांत म्हणाला, 'मला समजलें कीं तुम्ही त्याचे मित्र आहांत...'

'तर मग तुम्हांला जें समजलें आहे तें अजिबात चुकीचें आहे.' सुधाकर म्हणाला, 'मला तो माझ्या दृष्टीसमोरहि सहन होत नाहीं. त्यानें माझी मैत्रीण पळविली नाहीं काय ? विलासिनी त्याच्या नादीं लागल्यापासून मी त्याचा तिरस्कार करतों. माफ करा–या खाजगी गोष्टी आहेत. पण आपण त्या पाजी माणसाबद्दल बोलायलाच हवें काय ?'

'होय. बोलायलाच हवें.' झुंजार म्हणाला.

'शेवटीं माझाच तर्क बरोबर ठरला.' सुधाकर खुनशीपणें म्हणाला,

'मला त्या माणसाचा नेहमींच अविश्वास वाटे. आतां तो खुनी आहे हें उघडकीस आलें आहे ! गेलीं सहा वर्षें तो तुरुंगाच्या हॉस्पिटलांत असायला हवा होता. पण खुशाल उघडपणें समाजांत वावरत होता. पण तुम्हांला— म्हणजे सी. आय्. डी. ऑफिसला ते कसें समजलें ? म्हाताऱ्या गरुडांनीं तें रहस्य फोडलें काय ? आश्चर्य आहे ! मला वाटत होतें कीं ते तसली गोष्ट कधींच कुणाला कळूं देणार नाहींत.'

झुंजार त्या माणसाकडे कुतूहलानें पहात होता. त्यानें विचारलें, ' सुधाकर, आपण अंथरुणावरून उठलां कधीं ?'

' फार वेळ झाला नाहीं. पण कां ?'

' तुम्हीं आजचीं वर्तमानपत्रें पाहिलींत काय ?'

' नाहीं.' सुधाकर म्हणाला.

' तुम्हांला कुणी भेटायला आलें होतें काय ?'

' नाहीं. पण काय...'

' तुम्हीं रेडिओ चालू ठेवला होता काय ?'

' अरे देवा ! यावेळीं ? पण हा काय प्रकार आहे ?' सुधाकरानें विचारलें.

' जर तुम्ही आतांच उठलांत आणि तुम्हांला कुणी भेटलें नाहीं तर शरद हा वेडयाच्या हॉस्पिटलांतून फरारी झालेला गुन्हेगार आहे हें तुम्हांला कसें समजलें ?'

' कां, मीं ऐकलें ...'

' ठीक आहे. बोला, पुढें बोला.' झुंजार म्हणाला.

' हें पहा माझी प्रकृति बरी नाहीं.' सुधाकर म्हणाला, ' कालचा दिवस फारच वाईट गेला होता. मला हे प्रश्न विचारण्याचें कारण काय ? माझें डोकें एखादा डायनामो सुरू असावा तसें ठणकत आहे—'

' तुम्हांला कालचा दिवसच नव्हे तर गेली रात्रहि वाईट गेली असावी असें तुमचा चेहरा सांगतो.' झुंजार म्हणाला, ' सुधाकर, मला तुमच्या डोक्याबद्दल फार वाईट वाटतें...'

' तुम्हांला कधीं असला अनुभव आला नाहीं काय ?' जरा चिडूनच सुधाकरानें विचारलें, ' विलासनें त्या पाजी माणसाबरोबर लग्न केलें. मी खूप पिऊनच लग्नाला हजर राहिलों हें कबूल करतों. नंतर मी मुंबईस परत आल्यानंतर मला इतकें बेचैन वाटूं लागलें कीं मी एका क्लबमध्यें गेलों आणि तेथेंहि भरपूर प्यालों. मला कांहीं आठवतच नाहीं ...'

' साहेब, हें चालणार नाहीं.' झुंजारनें त्याला बजाविलें —' तुम्हांला सर्व आठवलेंच पाहिजे. गेल्या रात्रीच्या खुनाबद्दल तुम्हांला कांहीं माहिती नाहीं ?'

' खू-खू-खून !' सुधाकर दचकून म्हणाला, ' तुम्ही हें काय बोलता

आहां ? मला कुठल्याहि खुनाबद्दल कशी माहिती असणार ?'

'सुधाकर, मला वाईट वाटतें, पण हे प्रश्न विचारणें माझें कर्तव्य आहे.' झुंजार म्हणाला. तो मनांतून खूष झाला होता–' गेल्या मध्यरात्रीच्या सुमारास माटुंगा येथें एका मुलीचा खून झाला.'

सुधाकर आतां घाबरलेला दिसत होता–' माझी कल्पना होती कीं, तुम्ही शरदबद्दल प्रश्न विचारण्यास आलां आहांत आणि आतां ही खुनाची काय भानगड आहे ? मी तुम्हांला शरदबद्दल कांहींच सांगूं शकणार नाहीं. मी त्या पाजी माणसाचा द्वेष करतों. माझी आणि विलासची कित्येक वर्षांची मैत्री आहे आणि काल आलेला हा उपटसुंभ तिला पळवितो ! तिनें पण माझी पर्वा केली नव्हती ! कां तें समजत नाहीं. मी श्रीमंत आहें–दिसण्यांत वाईट नाहीं–चांगल्या घराण्यांतील आहे '

'फक्त तुम्ही खूप दारू झोंकतां, खरें ना ?' झुंजार म्हणाला.

'तुम्ही माझ्या घरांत मला हें ऐकवतां ?' सुधाकर धडपडत उभा रहाण्याचा प्रयत्न करीत ओरडून म्हणाला, 'चालते व्हा येथून ! तुम्ही कोणीहि असलांत तरी मला पर्वा नाहीं. मी यापुढे तुमच्या एकाहि प्रश्नाचें उत्तर देणार नाहीं.'

'तुम्हांला एका प्रश्नाचें उत्तर द्यावेंच लागणार आहे.' झुंजारनें त्याला रुबाबांत बजाविलें–' तुम्ही गेल्या रात्रीं अकरा वाजल्यापासून पहाटें दोन वाजेपर्यंत काय करीत होतां तें सांगितलेंच पाहिजे.'

सुधाकर एकाएकीं खालीं बसला. तो आतां अतिशय घाबरला होता. झुंजारनें त्या माणसाचें मोजमाप घेतलें होतें. ती पांचशें दोन नंबरच्या जागेंतली चपळाई करण्यास सुधाकराला कित्येक जन्म घ्यावे लागले असते.

'त्या खुनाशीं माझा संबंध असावा असा तुम्हांला संशय येतो कीं काय?' त्यानें घोगऱ्या आवाजांत विचारलें.

'मला तुमचा कसलाहि संशय येत नाहीं.' झुंजार म्हणाला, 'मला फक्त मी विचारलेल्या तीन तासांत तुम्हीं काय करीत होतां ती माहिती हवी आहे.'

'मी गेल्या रात्रीं लवकरच जेवलों. जेवल्यानंतर दारू प्यालों. नंतर एका क्लबमध्यें गेलों आणि आणखीं दारू झोंकली ...'

'कोणता क्लब ?' झुंजारनें विचारलें.

'रेल्वे क्लबमध्यें. मी घरीं येईपर्यंत तेथेंच होतों. पंढरीनें मला टॅक्सींत घालून येथें आणलें.'

'तुम्ही त्या क्लबमध्यें कधीं गेलां हें तरी तुम्हांला आठवत असेल ?'

'दहा, साडेदहा वाजतां.' सुधाकर म्हणाला.

'आणि परत कधीं आलां ?'

' मध्यरात्र झालीच असणार.'

'तर तुम्ही साडेदहा वाजून बारापर्यंत क्लबमध्यें होतां.' झुंजार म्हणाला, ' याला दुजोरा देणारे साक्षीदार आहेत काय? त्या क्लबचा मॅनेजर–वेटर्स–किंवा तुम्ही म्हणतां तो पंढरी ?'

'पंढरी खात्रीनें साक्ष देईल.' सुधाकर अधीरतेनें म्हणाला, 'पंढरी तारकर माझा मित्र आहे. म्हणजे तसा मित्र नाहीं. पहिल्या नंबरच्या लुच्चा माणूस! पण तुम्हांला माहीत आहेच. पिणाऱ्यांचे सर्वच दोस्त. मीं त्यालाहि पाजली. आम्हीं गप्पागोष्टी केल्या. मीं त्याला माझी भानगड सांगितली–'

'तुम्हीं त्याला भानगड सांगितलीत?' झुंजारनें मध्येंच विचारलें, 'पण तुम्हीं जर वर्तमानपत्र वाचलें नाहीं तर शरद हाच रघुवीर तिरंदाज आहे हें तुम्हांला कसें समजलें ?'

'असे माझ्यावर तुटून पडूं नका.' सुधाकर म्हणाला, 'मला वाटलें कीं त्या थेरड्यानें ती बातमी तुम्हांला कळविली–'

'त्यामुळें खुलासा होत नाहीं.' झुंजार म्हणाला, 'तुम्ही काल दुपारीं आबासाहेबांच्या बैठकीच्या खोलींत दडी मारून बसलां होतां व तेव्हां ती माहिती मिळविलीत. खरें ना?'

'अरेच्चा!' झुंजारकडे विस्फारित नजरेनें पहात सुधाकर म्हणाला, 'तुम्हांला तें कसें समजलें ?'

'तें मी सांगूं शकणार नाहीं. पण शरदनें आपण कोण हें आबासाहेबांना सांगितलें तें तुम्हीं चोरून ऐकलेंत ना?'

'तुम्हांला तर सर्वच माहीत आहे! साहेब, मी तेथें होतों. हातांत दारूची बाटली होती व अचानक दार उघडलें म्हणून पडद्याआड झालों, पण त्याचवेळीं शरद तसला बॉम्बगोळा फेंकणार हें मला कसें माहीत असणार? माझी कल्पना होती कीं ते लागलीच बाहेर निघून जातील.'

'ठीक आहे. पण तुम्हीं ही माहिती स्वतःपुरतीच ठेवली नाहींत. दारूच्या तालांत तुम्ही बोललांत. तुम्हीं किती जणांना ती सांगितली?'

'कुणालाहि नाहीं. मी तसली माहिती दुसऱ्यांना सांगण्याइतका मूर्ख आहें काय?'

'पण तुम्हीं तुमचा मित्र पंढरी तारकर याला ती सांगितलीत ना?

'आठवत नाहीं.' दोन्ही हातांनीं डोकें आंवळीत सुधाकर म्हणाला 'मला वाटतें, सांगितली असावी. होय, पंढऱ्या कां कुणाला ठाऊक पण हादरला होता. त्याला धक्का बसण्याचें कारण काय याचा मी विचार करीत होतों.'

'हा तुमचा मित्र कुठें राहतो तें सांगाल काय?'

'होय. गोलपिठ्याच्या नाक्यावर राम भरोसे हॉटेलांत. तें अगदींच ...ळ हॉटेल आहे.'

'तुम्हीं दुसऱ्या कुणालाहि तें सांगितलें नाहीं अशी खात्री आहे?'

'होय. गेल्या रात्रीं फक्त तोच मला भेटला होता.' सुधाकर ...ाला.

'सुधाकर, या माहितीबद्दल आभारी आहें. मी तुम्हांला आणखीं त्रास ... इच्छीत नाहीं.' झुंजार उभा रहात म्हणाला, 'जर कधीं तुमची ...र लागली तर सी. आय्. डी. ऑफिसांत या. तिसऱ्या मजल्यावर उजव्या ...ाचें पहिलेंच दार. आनंदराव म्हणून चौकशी करा. आपण ... मिळून थोडी घेऊं. माझ्या फडताळांत एक बाटली नेहमीं तयार ...ते.'

सुधाकर त्याच्याकडे तोंड उघडून पहातच राहिला.

## ३ : आनंदीचा प्रियकर !

'मी ईश्वराचे आभार मानतों ! तुम्हांला पाहून मला खरोखरच आनंद ...ला.' तो मोटारीजवळ जातांच विजया म्हणाली, 'मला चिंता वाटं ...गली होती.'

झुंजार हंसत म्हणाला, 'अर्धा डझन सुधाकरांचा मी फक्त डाव्या ...ानेंच समाचार घेईन. विजू, आपणांला हवा असलेला तो माणूस ...हीं, पण वेळ अगदींच फुकट गेला नाहीं. आतां आपणांला आनंदरावांकडे ...याचें आहे.'

'कशासाठीं ?' तिनें आश्चर्यानें विचारलें.

'पंढरी तारकर नांवाच्या माणसाची माहिती त्यांच्याकडे असण्याचा ...व आहे.' तो म्हणाला आणि मोटार सुरू केल्यानंतर त्यानें सुधाकरा...ल तिला माहिती दिली.

'प्रश्न असा आहे कीं अगदीं नवशिक्या माणसाला तिरंदाजाची हकीकत ...न धक्का कां बसावा ? त्याच्या वर्णनावरून आनंदराव त्या माणसाला ...ळखत असावेत असा माझा तर्क आहे.' झुंजार म्हणाला.

'तुम्ही दोघेहि आलांत ?' आनंदराव त्यांच्याकडे पाहून म्हणाले, ...ुंजार, तुझा विचार बदलला आहे व तूं सभ्य नागरिकाप्रमाणें तुझें कर्तव्य ...ण्यास तयार आहेस असें मला सांगणार आहेस काय ?'

'हा प्रश्नच वेडेपणाचा आहे.' विजया हंसून म्हणाली, 'हे कायदा ...नणारे सभ्य नागरिक नाहींत हें तुम्हांला माहीतच आहे.'

'आणि तुम्ही कसल्या कर्तव्याबद्दल बोलतां ?' झुंजारनें विचारलें.

'तूं शरदला लपविलें आहेस. जर मला थोडासा पुरावा मिळाला तर

मी तुला अटक करीन.' आनंदराव म्हणाले.

'मला हा तुमचा आवाज आवडत नाहीं.' झुंजार म्हणाला, "मी तुम
मदत करण्याचाच प्रयत्न करीत आहें हें तुमच्या मठ्ठ डोक्यांत कसें 
नाहीं ? येत्या चोवीस तासांत खऱ्या खुनी माणसाला मी तुमच्या मां
बसविणार आहें. तुम्ही इथें आराम करीत आहांत आणि मी सारखा 
चीहि विश्रांति न घेतां धांवपळ करीत आहें. तुम्हांला पंढरी तारक
काय माहिती आहे ?'

'पण तूं हें कां विचारतोस ?' आश्चर्यानें त्याच्याकडे पहात अ
रावांनीं उलट विचारलें.

'सहज, कुतूहल म्हणून.' झुंजार म्हणाला.

'तूं लबाड आहेस !' आनंदराव म्हणाले, 'बारा वर्षांपूर्वी आनंदी मे
हा तारकर खास मित्र होता.'

'काय ?' झुंजारनें आश्चर्यानें विचारलें.

'तुला तें माहीत नाहीं ?'

'आनंदराव, खरोखरच मला तें माहीत नव्हतें' झुंजार मन
म्हणाला, 'मला त्याची सर्व माहिती सांगा. अगदीं क्षुल्लक गोष्टहि
नका.'

'आज सकाळीं मी त्याचीच फाइल चाळीत होतों.' आनंदराव झुंजा
तीव्र संशयानें पहात म्हणाले, 'आनंदीचा खून झाला त्या रात्रीं तो दु
दोघां साथीदारांसह एका बँकेची चोरी करण्यांत गढला होता. त्यामुळें 
त्या गुन्ह्याशीं संबंध जोडतां आला नाहीं. पण त्याला आनंदीबरोबर
करायचें होतें आणि इतरांबरोबर तिची मैत्री त्याला आवडत नसे.
स्वच्छंदी मुलगी होती व तरुण व अनुभव नसलेल्या रघुवीरला तो खेळवं
असेल.'

'आपण आतां रघुवीरबद्दल बोलत नाहीं.' झुंजार म्हणाला, 'तारक
तिच्याबरोबर लग्न करायचें होतें, तेव्हां त्यानेंच तो खून करून ...'

'झुंजार, तुला वाटतें तितके पोलीस मूर्ख नाहींत.' आनंदराव म्ह
'खुनाच्या वेळीं तारकर अटकेंत होता. त्याला पकडलें तेव्हां आनंदी 
होती त्यानें त्यापूर्वीं दोन वेळां शिक्षा भोगल्या होत्या व या खेपेला 
पांच वर्षें तुरुंगांत पाठविण्यांत आलें होतें. पण तूं ही चौकशी कां चाल
आहेस ?'

'सहज.' झुंजार म्हणाला, 'तो आतां कुठें आहे ?'

'तो कुठें आहे तें आम्हांला माहीत आहे.' आनंदराव म्हणाले, 'तो
कित्येक वर्षें आमच्या हातीं सांपडला नाहीं. तो बदमाष आहेच, पण
फार सावधगिरी बाळगीत असतो. झुंजार, तुझी इच्छा असली तर तूं 

ो खूप माहिती सांगूं शकतील...'
'पण माझी इच्छा नाहीं. त्याला कारणेंहि तशींच आहेत.' झुंजार म्हणाला.
'तर मग तूं कबूल करतोस कीं...'
'मी कांहींच कबूल करीत नाहीं.' झुंजार मध्येंच म्हणाला, 'आनंदराव, व्या घरच्या मंडळींना माझे रामराम कळवा. चल विजू.'
'मलाहि ही जागा तितकीशी आवडत नाहीं.' नाक उडवीत विजया ाली.
ोटारींत बसल्यानंतर झुंजार म्हणाला, 'विजू, ही माहिती महत्त्वाची . तुझ्या तें लक्षांत येत नाहीं काय ?'
तुम्हीच मला तें नीट सांगा.' म्हणाली.
या तारकराचें आनंदीवर प्रेम होतें. तो अटकेंत असतांनाच त्याला ुनामी बातमी समजली. पण तो त्यावेळीं कांहींच करूं शकणार नव्हता. ुरुंगांतून बाहेर आल्यानंतर आनंदीचा खुनी वेड्याच्या हॉस्पिटलांतून ी झाला हें त्याला समजलें. नंतर अचानक एके रात्रीं रघुवीर तिरंदाज हें त्याला समजलें.'
आतां तुमच्या बोलण्याचा अर्थ माझ्या लक्षांत आला.' विजया म्हणाली.
सुधाकरानें दारूच्या धुंदींत तारकरला ती माहिती दिली. विजू, त्यावेळीं कराला काय वाटलें असेल ?'
पण सुधाकरानें त्याला सर्व माहिती–पत्ते सांगितले असतील ?'
सुधाकर धुंदींत होता. तारकरानें प्रश्न विचारून ती माहिती मिळविली ार. दहा वर्षें तो तिरंदाजाचा द्वेष करीत होता आणि आतां त्याला सूड ची नामी संधि मिळाली होती. त्यानें दारुड्या सुधाकराला त्याच्या नेऊन सोडलें आणि ...'
पण त्यानें त्या निरपराधी मुलीचा खून कां करावा ?'
तूं या गरमागरम तर्कावर थंड पाणी ओतण्याचा प्रयत्न करूं नकोस.' र म्हणाला, 'बदमाषाच्या मनांत काय येईल हें सांगणें कठीण असतें. ा आतां रामभरोसे हॉटेलांत जाऊन त्या तारकरभाऊची भेट घेऊं. पण ्रीं आपण एका मिनिटासाठीं घरीं जाऊं. मला एक वस्तु बरोबर ची आहे'
कोणती ?' तिनें विचारलें.
पिस्तुल. तो माणूस जहरी सर्पाप्रमाणें घातकीहि असेल. माझी खात्री कीं आपण लवकरच शरदला संकटमुक्त करूं.'
टेंत झुंजारनें संध्याकाळचीं वर्तमानपत्रें विकत घेतलीं, पण त्यांत नवीन कांहींच नव्हतें. पोलीस मंजुळेच्या खुनाचा तपास करीत आहेत व खुनी ाला लवकरच अटक करण्याची पोलिसांना आशा आहे, त्याचप्रमाणें

शरद ऊर्फ रघुवीर तिरंदाज अद्याप बेपत्ता आहे असें त्यांत म्हटलें हो
त्यांत आबासाहेब, विलासिनी आणि शरद यांचे फोटोहि छापले होते. ए
वर्तमानपत्रांत तर रामलालचाहि फोटो होता.

झुंजारनें आपल्या झुंजार–महालाच्या प्रवेशद्वाराजवळ मोटार थांब
विजयेला एक मिनिटभर थांबण्याची सूचना दिली. त्यानें रामलाल
फोटो असलेलें वर्तमानपत्र बरोबर घेतलें होतें. त्यानें रामलालचा फो
व्यवस्थित फाडून काढला. त्यानें एक लहानसा प्रयोग करण्याचें ठरविलें हो

तो ऑफिसांत गेला. 'मनमोहन, तूं त्या माणसाला आपली पांच
दोन नंबरची जागा दाखविलीस ना ?' त्यानें सहज स्वरांत आपल्या मॅ
जरला विचारलें.

'मालक, मी तुम्हांलाच शोधीत होतों.' मनमोहन सचित स्वरांत म्हणाल
'ती काय भानगड आहे ? मीं तुमच्या सूचनेप्रमाणें त्या माणसाला तेथं
सोडलें, पण बराच वेळ झाला तरी तो खालीं आला नाहीं म्हणून खंडोजी
चौकशी करण्यासाठीं वर पाठविलें. तर तो माणूस तेथें नव्हता आ
बाथरूम पाण्यानें तुडुंब भरली होती.'

'मी तुला त्याबद्दल नंतर सांगेन.' झुंजार म्हणाला, 'खरें पाहिल्य
तो माझाच अपराध होता. मी त्याला फवारा दाखवीत होतों आणि माझ
कांहीं चूक झाली असावी.'

'मालक, खरोखरच असें घडलें ?' त्याच्याकडे रोखून पहात मनमोह
विचारलें.

'ही माझीच हकीकत आहे आणि मी तिला चिकटून रहाणार आ
झुंजार म्हणाला, 'पण मोहन, मला एका गोष्टीचा खुलासा हवा अ
ज्याला तूं जागा दाखविलीस तो हाच माणूस होता काय ?'

मनमोहननें तो वर्तमानपत्रांतील फोटो न्याहाळून पाहिला आणि
म्हणाला, 'नाहीं, या माणसांत आणि त्याच्यांत बिलकुल साम्य नाहीं.'

'तुझी खात्री आहे ?' झुंजारनें विचारलें.

'अर्थातच. तो वसंतराव जाधव वयस्क होता. त्याचें तोंड चमत्का
व वेगळेंच ढिलें पडलेलें दिसत होतें. त्याचे डोळे कांचेसारखे व निश
होते. तुम्हीं टेलिफोन केला नसता तर मीं त्याला जागा दाखविलीच नस
पण मालक, तो कोण होता ?'

'मी तुला तें नंतर सांगेन.' त्याच्या हातांतील फोटो काढून घेत झुं
म्हणाला.

'पण मालक, तो फोटो ओळखीचा वाटतो.' मनमोहन म्हणाला, '
याच माणसाचा दुसरा फोटो, दुसऱ्या वर्तमानपत्रांत पाहिला आहे.
शरदच्या प्रकरणांत ... वधूचा ... मालक, तुम्हांला असें तर वाटत नाहीं

'मला जें वाटत नाहीं त्याला महत्त्व नाहीं. जें वाटतें तें महत्त्वाचें आहे.' झुंजार दाराकडे जात म्हणाला, 'मनमोहन, तें विसर.'

तो विचार करीत लिफ्टनें वर गेला. तो ढिल्या तोंडाचा, कांचेसारखे डोळे असणारा माणूस कोण ? तो सुधाकर नव्हता यांत शंकाच नव्हती.

कांहीं वेळानें झुंजार परत आला व तीं रामभरोसे हॉटेलकडे निघालीं. त्यानें आपणांला बरोबर घेतलें याचा विजयेला आनंद होत होता. तें काम घातकीहि असूं शकणार होतें.

एक घामट व ढेरपोट्या गुजराथी इसम फक्त गंजीफ्रॉक चढवून मॅनेजराच्या टेबलाजवळ बसला होता. त्यानें दोघां पाहुण्यांकडे कुतूहलानें पाहिलें. ते त्या ठिकाणीं रहावयास आले असतील असें त्याला वाटत नव्हतें.

'मी पंढरीनाथ तारकरांला भेटावयास आलों आहें.' झुंजार म्हणाला, 'तो या हॉटेलांत रहातो असें मला सांगण्यांत आलें आहे. जर तुम्ही मला त्याच्या खोलीचा नंबर सांगाल—'

'तारकरांची प्रकृति बरी नाहीं.' मॅनेजर मध्येंच म्हणाला.

'पण तरीहि मला त्याच्या खोलीचा नंबर हवा आहे.' झुंजार म्हणाला.

'तारकर कुणालाच भेटणार नाहींत.' तो ढेरपोट्या मॅनेजर म्हणाला, 'सव्वादहा वाजतां त्यांना कुणाचा तरी टेलिफोन आला होता. अकरा वाजतां त्यांनीं आपली प्रकृति बिघडली असें सांगितलें आणि डॉक्टर सोमणांना बोलविलें. डॉक्टर आले तेव्हां मींच त्यांना वर जाऊन खोली दाखविली. डॉक्टर काम संपवून परत जातांना मला भेटले आणि तारकरांना मुळींच त्रास होतां कामा नये म्हणून त्यांनीं मला बजाविलें. तेव्हां तुम्ही वर जाऊं शकणार नाहीं.'

पण झुंजारचें समाधान झालें नव्हतें. तो म्हणाला, 'मी वर जाणारच. तूं बऱ्या बोलानें नंबर सांगणार आहेस कीं मी मालकाकडे जाऊं...'

'ठीक आहे साहेब.' मॅनेजर झुंजारचा उग्रावतार पाहून घाईघाईनें म्हणाला, 'पहिला मजला, सतरा नंबर—'

झुंजार विजयेचा हात धरून अर्धवट अंधाऱ्या जिन्यानें वर गेला. तो मॅनेजर सतरा नंबरच्या खोलींत टेलिफोन करीत असणार अशी त्याची खात्री होती.

'विजू, हें बघ !' झुंजार म्हणाला. तीं सतरा नंबरच्या दाराजवळ पोहोंचलीं होतीं आणि तें दार अर्धवट उघडें होतें !

'तो गंभीर आजारी नसणार.' विजया हळूच म्हणाली, 'तो एका मिनिटांकरिता कुठें बाहेर गेला असेल.'

'तुझें म्हणणें बरोबर ठरो.' झुंजार म्हणाला, 'पण मी दुसराच विचार

करीत होतों.'

'दुसरा विचार?' तिनें बुचकळ्यांत पडून विचारलें.

'होय, पुन्हां अर्धवट उघडें दार!'

'अरे देवा!' ती म्हणाली, 'मी... मी तें विसरलेंच होतें. तुम्ही असें तर...'

तिला तें वाक्य पूर्ण करणें जड गेलें. झुंजारनें खिशांतलें छोटें पिस्तुल हातीं घेतलें आणि तें दार उघडलें. त्यानें हळूच आंत प्रवेश केला. त्याच्या पाठीमागें विजया होतीच.

ती खोली तशी प्रशस्त पण अगदींच कोंदट–घामट अशी होती. त्यांनीं तसल्या हॉटेलांत कधीं प्रवेश केला नव्हता आणि ती खोली रिकामी होती.

झुंजारनें समोरच्या अर्धवट उघडया दाराकडे पाहून सूचकतेनें मान हलविली. ती तारकराची झोंपण्याची खोली असणार. तो पुढें गेला आणि त्यानें पायानेंच तें दार उघडलें आणि तो बाहेरच उभा राहिला.

पण कांहीं घडलें नाहीं. त्यांना कसलाच आवाज ऐकूं आला नाहीं. त्या दोन खोल्यांतील शांतता विचित्र होती. झुंजारनें एक पाऊल पुढें टाकलें आणि तो उंबरठ्यावरच थांबला.

खालीं तोंड करून खाटेवर तारकर पडला होता व त्याच्या पाठींतून एका मोठ्या सुऱ्याची मूठ बाहेर डोकावत होती.

## १४ : झुंजारचा बेत!

'अरे देवा!' विजया हादरून म्हणाली, 'तुम्हांला वाटतें की तो...'

'तो जिवत नाहीं!' ती घुटमळल्यामुळें झुंजारनें तिचा प्रश्न पूर्ण केला. 'सहा इंच सुरा पाठींत खुपसल्यानंतर तो जिवंत रहाणें कसें शक्य आहे? विजू, हें सैतानाचें काम आहे.'

झुंजारनें पुढें सरकून खात्री केली पंढरी तारकर लागलीच ठार झाला होता.

'आपण येथून बाहेर पडूं या.' विजया शहारे देत म्हणाली, 'सकाळीं तुमच्यावर यानें हल्ला केला नव्हता असें सिद्ध होतें. तेव्हां यानें मंजूचाहि खून केला नाहीं!'

'नाहींच.' झुंजार तिच्यासह बाहेर पडून दार बंद करीत म्हणाला, 'खुनी माणसाची धांवपळ उडालेली दिसते. गेल्या रात्रीं मंजुळा, सकाळीं माझ्यावर हल्ला आणि आतां हा भाई तारकर.'

तळमजला गांठल्यानंतर झुंजार मॅनेजराकडे गेला. 'तारकर आजारी आहे हें तुझें म्हणणें बरोबर आहे. खरें सांगायचें तर इतका आजारी माणूस मीं कधीं पाहिला नाहीं. पण, तुझे ते डॉक्टर सोमण कधीं आले होते?'

' सव्वाअकरा वाजतां. ते पंधरा मिनिटें येथें होते.' मॅनेजर म्हणाला.

' ते दिसण्यांत कसे होते ?' झुंजारनें विचारलें.

' तुम्ही फार चमत्कारिक प्रश्न विचारतां.' मॅनेजरनें तक्रार केली–'डॉक्टर कसे होते तें मी कसें सांगणार ? ते आले आणि लागलीच वर गेले मीं त्यांना नीट पाहिलेंहि नाहीं. त्यांनीं रेनकोट व फेल्ट हॅट घातली होती व गळ्याभोंवतीं मफलर गुंडाळला होता. उकाडा होत असतांना त्यांनीं रेनकोट चढवावा हें मला विचित्र वाटलें होतें.'

' तूं त्या डॉक्टराचा चेहरा, डोळे, तोंड वगैरे पाहिलेंस काय ?'

' त्यांचें तोंड चमत्कारिक होतें डोळे चांगले नव्हते. ते स्थिर होते. तो खालीं आला तेव्हां त्यानें माझ्याकडे पाहिलें नाहीं. तारकराला मुळींच त्रास द्यायचा नाहीं असें मला बजावून तो निघून गेला.'

झुंजारनें त्याला सोडला. बाहेर पडल्यानंतर त्याला आणि विजयेलाहि बरें वाटलें. तें खुनाचें दृश्य भयंकरच होतें.

' तोच माणूस.' झुंजार म्हणाला, ' त्याची आणि तारकराची ओळख होती. त्यानें टेलिफोन करून आपण भेटावयास येत आहों असें तारकराला कळविलें आणि तारकरानें आपली प्रकृति बरी नाहीं, आपणांला तपासावयास डॉक्टर येत आहेत असें मॅनेजराला खोटें सांगितलें. आपणांला धोका आहे असें तारकरला वाटलें नव्हतें. तो बेसावध असतांना त्याच्या पाठींत सुरा खुपसण्यांत आला.'

' पण तो कोण ?' विजयेनें विचारलें.

' तो कुणीहि असो, पण फार जलद काम करणारा आहे.' झुंजार म्हणाला, ' मी तें लवकरच आनंदरावांना कळवीन.' झुंजार मोटारीचा वेग वाढवीत म्हणाला, ' पण आधीं मला शरदला भेटायचें आहे.'

झुंजार महालाकडे जातांना विजया विचारांत गढली होती ती एकाएकीं म्हणाली, ' शरद त्या माणसाच्या वर्णनावरून ओळखूं शकणार नाहीं. कां तें मी तुम्हांला सांगतें आबासाहेबच खुनी आहेत !'

' काय म्हणतेस ?' झुंजार आश्चर्यानें म्हणाला.

' तें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे. दुसरा कुणी नाहींच. मीं रामलालचें नांव सुचविण्यांत फारशी चूक केली नव्हती. त्या म्हाताऱ्याचेंच तें काम. त्यानें हे खून करायला कुणातरी बदमाषाला हातीं धरलें आहे. तो वकील असल्यामुळें तो अनेक बदमाषांना ओळखत असणार.'

' पण त्यांनीं मला ठार करण्याचा कां प्रयत्न करावा ?' झुंजारनें विचारलें.

' कारण तुम्हांला बरीच माहिती आहे व तुम्ही त्यांच्या बाजूचे नाहींत.'

' आणि तारकर ?'

'त्याला आपणांला माहीत नसलेल्या कांहीं कारणामुळें ठार करण्यांत आलें आहे.' ती म्हणाली.

'तुझा हा तर्क विचार करण्यासारखा आहे. पण त्याला बरींच छिद्रें आहेत.' झुंजार विचार करीत म्हणाला, 'शरदला ठार करण्याचा त्यांनीं डाव रचलाच होता. पण ते मंजूला ठार करण्याचें कारस्थान रचतील हें अद्याप मला पटत नाहीं'

'आपल्या मुलाला वांचविण्यासाठीं–अर्थात् त्यांच्या मतें आबासाहेब वाटेल तें करतील ही गोष्ट लक्षांत ठेवा.' विजया म्हणाली.

तीं झुंजार महालांत गेलीं. तेव्हां एक आश्चर्य त्यांची वाट पहात होतें. विलासिनी तेथें आली होती

झुंजारनें थोडें चिडून पण बऱ्याचशा सहानुभूतीनें तिच्याकडे पाहिलें. 'तूं येथें यायला नको होतें.' तो म्हणाला, 'या जागेवर सी. आय्. डी. ची नजर असणार. तूं येथें आल्यानंतर शरद याच ठिकाणीं आहे अशी ते खूणगांठ बांधतील पण जें झालें त्याला इलाज नाहीं. तुला शरदला भेटायचें असेल ?'

'ते–ते येथेंच आहेत ?' विलासिनी आश्चर्यानें म्हणाली, 'तुम्हीं आमच्यासाठीं भलताच धोका पत्करला आहे ! माझ्या हातून चूक घडली असली तर मला क्षमा करा.'

'तो येथें नाहीं, पण फार दूरहि नाहीं.' झुंजार म्हणाला. विलासिनीची मनःस्थिति कशी असावी हें तो ओळखत असल्यामुळें तिच्यावर रागावूं शकत नव्हता–' चल, मी तुझी आणि त्याची भेट करून देतों.'

झुंजार–विजयेनें तिला खालच्या मजल्यावरील शरदच्या खोलींत नेलें. कांहीं वेळ त्या दोघांना एकत्र सोडल्यानंतर झुंजारनें आपल्या कामाला सुरुवात केली. विलासिनी भेटल्यामुळें शरदला तर जणूं नवजीवन मिळालें होतें

'शरद, आतां मला सांग, पंढरी तारकर नांवाच्या माणसाला तूं ओळखत होतास काय ?' झुंजारनें विचारलें.

'नाही. पण कां ?' त्यानें विचारलें.

'फक्त आज सकाळीं त्याचा खून झाला आहे.' झुंजार म्हणाला.

त्यानें सांगितलेली हकीकत ऐकून त्या जोडीला धक्का बसला होता पण झुंजारला त्याची मदत होऊं शकत नव्हती. त्यानें खुनी माणसाचें वर्णन केलें पण विजयेच्या तर्काप्रमाणें शरद त्या माणसाला ओळखत नव्हता.

'पण यांना संकटांत लोटण्यासाठीं या भयंकर गोष्टी कुणीं कां कराव्या?' विलासिनीनें विचारलें, 'तो खुनी माणूस वेडा असेल काय ?'

'नाहीं. तो माणूस आपणांप्रमाणेंच शहाणा व अतिशय धूर्त आहे.' झुंजार म्हणाला, 'तो आपल्या योजनेप्रमाणें काम करीत आहे. पण त्याला फार

घाई करावी लागली व त्यामुळें त्यानें एक-दोन चुका केल्या आहेत. त्या चुकांमुळेंच तो लवकर पकडला जाणार आहे.'

'झुंजारराव, हें खरें काय ?' विलासिनीनें आश्चर्यानें विचारलें, 'या भयंकर आरोपांतून यांची मुक्तता होईल असें तुम्हांला वाटतें काय ?'

'शरदवरील ह्या आरोप तर दूर होणारच, पण बारा वर्षांपूर्वीच्या आरोपांतूनहि त्याची मुक्तता होणार आहे.' झुंजार आत्मविश्वासानें म्हणाला, 'एक गोष्ट आहे, सत्य तुम्हांला मोठा धक्का देणारें ठरणार आहे. त्यासाठीं तुम्हीं आतांपासूनच मनाची तयारी ठेवली पाहिजे.'

'म्हणजे मला धक्का बसणार आहे ?' विलासनें विचारलें.

झुंजारला शेवटीं आपलें म्हणणेंच पटूं लागलें आहे हें पाहून विजयेला मनांतून आनंद झाला होता.

'विलास, तुझे वडील कधीं "कॉन्टॅचक्ट् लेन्सेस" वापरतात काय ?' झुंजारनें विचारलें.

'म्हणजे काय ?' तिनें विचारलें.

'त्यांची दृष्टि अधु आहे व ते चष्मा वापरतात हें तुला माहीत आहे.' झुंजार म्हणाला, 'तसल्या दृष्टीच्या माणसासाठीं नंबरच्याच अगदीं पातळ कांचा डोळ्यांत बसविण्यांत येतात व त्यांना 'कॉंटॅक्ट लेन्सेस' म्हणतात.' झुंजार म्हणाला, 'चष्म्याऐवजीं त्या कांचाच डोळ्यांत बसवितां येतात.'

'होय, कांहीं महिन्यांपूर्वीं मीं बैठकीच्या खोलींतील टेबलाच्या खणांत तसल्या दोन कांचा पाहिल्या होत्या, पण तें काय हें मला समजलें नव्हतें.' ती म्हणाली, 'पण तुम्ही हें कां विचारतां ?'

'त्या गोष्टीला विशेष महत्त्व नाहीं.' झुंजार बेफिकिरीनें म्हणाला, पण ती माहिती ऐकून विजयेच्या मनांत प्रचंड खळबळ उडाली होती.

त्या दोघांना एकत्र सोडून झुंजार व विजया पुन्हां आपल्या बैठकीच्या खोलींत परतलीं.

'विजू, स्थिर डोळ्यांचा प्रश्न तर सुटला.' झुंजार म्हणाला, 'खुनी माणसानें तसल्याच कांचा चढविल्या होत्या, पण त्याचें ढिलें तोंड ...'

'तें मी तुम्हांला सांगतें.' विजया लागलीच म्हणाली, 'खुनी माणूस नकली दांतांच्या कवळ्या वापरीत असला पाहिजे आणि त्या त्यानें काढून घेतल्या तर त्याचें तोंड ढिलें आणि चमत्कारिक दिसेल.'

'शाबास विजू !' तिची पाठ थोपटीत झुंजार म्हणाला.

पण त्याचवेळी दोन गोष्टी घडल्या. खाजगी लिफ्टमधून आनंदराव बाहेर पडले आणि पुढल्या दारांतून विलासिनी आंत आली.

'अरेच्चा !' आनंदराव तिच्याकडे संशयानें पहात म्हणाले, 'तुम्ही

विलासिनीबाई ! तुम्ही येथें काय करीत आहांत ?'

'आनंदराव, तुमच्या कपाळावरील आंठ्या काढून टाका. तिला आम्हीं झुंजारमहाल पहावयास बोलाविलें होतें. विलास, हे सी. आय्. डी. सुपरिं-टेंडेंट आनंदराव, पण तूं यांच्याकडे लक्ष देऊं नकोस. ते नेहमींच असे पिसाळल्यासारखे वागतात. तूं आतां सरळ घरीं जा आणि कसलीच चिंता करूं नकोस. विजू, तूं तिला लिफ्ट दाखव !'

विलासिनी निघून गेल्यानंतर झुंजार हंसत आनंदरावांकडे वळला.

'झुंजार, ती येथें कां आली होती हें मी ओळखूं शकतों पण सध्यां मला दुसरें कांहीं बोलायचें आहे.' आनंदराव कपाळावर आंठ्या चढवून म्हणाले, 'थोड्या वेळापूर्वीं तूं तारकराबद्दल चौकशी करीत होतास आणि अर्ध्या तासापूर्वीं त्याच्या हॉटेलावर नजर ठेवणाऱ्या आमच्या माणसाचा रिपोर्ट आला आहे.'

'त्याचा रिपोर्ट खळबळजनक असणार ?' झुंजारनें विचारलें.

'त्या माणसानें तुम्हां दोघांना त्या हॉटेलांत शिरतांना आणि दहा मिनि-टांनी बाहेर पडतांना पाहिलें म्हणून तो तारकराच्या खोलींत गेला आणि त्याचा खून झाला आहे असें त्याला दिसलें.' आनंदराव जोरांत म्हणाले, 'तूं हें कबूल करतोस काय ?'

'कबूल करायला काय हरकत आहे ? तुमच्या माणसानें आम्हांला पाहिलें म्हणतां... अरे देवा ! मीं तो खून केला असें तुमचें म्हणणें आहे कीं काय ?'

'तूं केला नाहींस हें आम्हांला माहीत आहे.' आनंदराव ओरडून म्हणाले, 'त्याचा एक-दोन तासांपूर्वीं खून झाला आहे पण तूं ती बातमी पोलिसांना कां कळविली नाहींस ? तेथल्या मॅनेजरलाहि कां सांगितली नाहींस ?'

'विश्वास ठेवा अगर ठेवूं नका. मी तुम्हांला तें कळविणारच होतों, पण इतर कामामुळें मला तशी सवडच मिळाली नाहीं.' झुंजार म्हणाला, 'त्या खुनी माणसानें मलाहि ठार करण्याचा प्रयत्न केला होता पण तुम्ही तें ऐकायलाच तयार नाहीं.'

'मला तें ऐकायचें नाहीं.' आनंदराव ओरडूनच म्हणाले, 'तुझ्या थापा पुरे झाल्या. ती विलासिनी येथें कां आली होती तें मीं ओळखलें नाहीं असें तुला वाटतें काय ? तूं त्या शरदला याच जागेंत लपविलें आहेस. त्याला बाहेर काढ नाहींतर मी झडतीचें वॉरंट मिळवीन.'

झुंजार हंसला— 'मी तुमच्यासाठीं इतकी मेहनत करीत आहें आणि तुम्ही मला धमक्या देतां ?' त्यानें विचारलें, 'अहो आनंदराव, याच इमारतींत मला बाथ-टब् मध्यें कोंबून ठार मारण्याचा प्रयत्न झाला होता. खोटें

वाटत असल्यास विजूला विचारा.'

'मला तें विचारायचें नाहीं.' आनंदराव ओरडून म्हणाले- 'तो शरद येथेंच आहे कीं नाहीं?'

'असला तर शोधून काढा.' झुंजार बेफिकिरीनें म्हणाला- 'त्याला या झुंजार महालांत लपविण्याइतका मी मूर्ख आहें काय? तुम्ही खुशाल झडतीचें वॉरंट मिळवा. या झुंजार महालांत शेंकडों बिऱ्हाडकरू आहेत. त्यांत कित्येक माजी संस्थानिक, सेवानिवृत्त न्यायाधीश, बॅरिस्टर, नट-नटया, कारखानदार व कमिशनरसाहेबांचा जांवईहि रहातो. तुम्ही त्यांच्या जागा तपासून जर तुमचें जगभर हंसे करून घेणार असलांत तर मी तुम्हांला अडवूं कशाला?'

झुंजारमहालासारख्या अति प्रचंड इमारतीच्या झडतीचें वॉरंट आपण मिळवूं शकणार नाही हें आनंदरावांना माहीत होतें. ते पाय आपटीतच निघून गेले.

'पोलिसांच्या दृष्टीनें खुनी असलेल्या माणसाला आश्रय दिल्याबद्दल तुम्हांला कमींत कमी किती शिक्षा होईल?' विजयेनें त्याच्याकडे टक लावून पहात विचारलें.

'पण मी त्याच्यावरील सर्व आरोप चुकीचे आहेत असें सिद्ध करणार आहें.' तो म्हणाला- 'शरद येथून उजळ माथ्यानेंच बाहेर पडेल.'

'आणि तुम्ही हा चमत्कार कसा करणार?' विजयेनें विचारलें.

'मला तितकी घाई नाहीं.' झुंजार म्हणाला- 'मी खुनी माणसाला थोडा विसांवा घेऊं देणार आहें. आज रात्रीं मी हालचाल करीन. पण आतां मला टेलिफोन करावयाचा आहे.'

त्यानें नंबर फिरविला आणि रामलालची चौकशी केली. त्याबरोबर विजया सावध होऊन त्याचें बोलणें लक्षपूर्वक ऐकूं लागली.

'कोण, झुंजारराव?' रामलालनें थोडचा नाराजीनेंच विचारलें- 'बाबा आतां झोंपले आहेत म्हणून बरें झालें...'

'हें पहा रामलाल, मला तुमची खाजगी, अगदीं गुप्त स्वरूपाची भेट हवी आहे.' झुंजार मध्येंच म्हणाला.

'पण कां? मला तुमची ही सूचना मान्य करतां येणार नाहीं. आपण बोलणार काय?' रामलालनें विचारलें.

'तें टेलिफोनवरून सांगतां येणार नाहीं.' झुंजार म्हणाला, 'तुम्ही रात्रीं जेवण झाल्यानंतर पाय मोकळे करण्यासाठीं बाहेर पडत असणार?'

'होय, बहुधा बाहेर पडतों.' रामलाल म्हणाला.

'तर मग आज रात्रीं बाहेर पडा.' झुंजार अगदीं स्पष्ट आवाजांत म्हणाला, 'बरोबर दहा वाजतां तुमच्या घराच्या मुख्य फाटकापासून दोनशें

यार्डावर माझी मोटार उभी असेल आणि मी एकटाच असेन. आपणांला खाजगी बोलतां येईल आणि तें तुमच्या वडिलांना किंवा इतर कुणालाहि समजणार नाहीं. तुमच्या लक्षांत आलें ना ?'

'तुमची योजना समजली. पण भेटायचें कशासाठीं तें समजलें नाहीं.'

'तें तुम्हांला रात्रीं दहा वाजतां समजेल.' झुंजार म्हणाला, 'काम अत्यंत महत्त्वाचें आहे आणि तुमच्या घराण्याच्या इभ्रतीचा प्रश्न आहे. तुमच्या वडिलांना हें मुळींच समजतां कामा नये. मला तुमची मदत लागेल. तुमच्या बहिणीच्या सुखाचा प्रश्न आहे.'

'झुंजारराव, तुम्ही तर मला घाबरावून सोडलें आहे आणि गोंधळांत पाडलें आहे. जर इतकी महत्त्वाची गोष्ट असली तर मी माझें सहकार्य नाकारूं शकणार नाहीं. तुम्ही दहा वाजतां, एकटेच तेथें असणार ना ?'

'होय, रामलालभाऊ.' झुंजार म्हणाला, 'आपण बरोबर दहा वाजतां भेटूं.'

'हा तुमचा कार्यक्रम आहे तर ?' त्यानें रिसीव्हर खालीं ठेवल्यानंतर विजयेनें उत्तेजित स्वरांत विचारलें, 'तुम्ही त्याला त्याच्या वडिलांबद्दल सांगणार आहांत. पण त्यामुळें काय फायदा होणार ? तो तुम्हांला त्याच्या वडिलांना जाळ्यांत अडकविण्यास मदत करील अशी जर तुमची कल्पना असली तर तुम्हांला वेड लागलें आहे असें म्हणावें लागेल.'

पण झुंजारचें तिच्या बोलण्याकडे लक्ष नसावें असें दिसलें. तो अर्धवट स्वतःशीच म्हणाला, 'जर मीं आनंदरावांना विश्वासांत घेऊन सर्व माहिती सांगितली आणि काम त्यांच्यावरच सोंपविलें तर कायद्याचीं चक्रें हलूं लागण्यांतच कित्येक आठवडे निघून जातील. म्हणून मी एकटाच हालचाल करणार आहें. विजू, आजच्या रात्रींतच मी हें प्रकरण निकालांत काढणार आहें.'

'पण तें कसें तें सांगाल कीं नाहीं ?' ती म्हणाली, 'त्यांत माझा भाग कोणता तेंहि मला समजलें पाहिजे.'

'त्यांत तुझा भाग असणारच नाहीं.' झुंजार हंसून म्हणाला, 'मीं रामलालला काय सांगितलें तें ऐकलें नाहींस ? फक्त तो आणि मी. मोटारींत त्याला फक्त मीच दिसणार आहें !'

## १५: खरा खुनी !

बरोबर दहा वाजले होते. त्या रात्रीं चंद्र दिसत नव्हता. अंधार पडला होता. विजयेची छोटी मोटार ठराविक ठिकाणीं उभी होती. झुंजार आंतल्या

बाजूला आरामानें बसून सिगारेट ओढीत होता. तो एकटाच होता.

'रामलाल, तूं वक्तशीर माणूस दिसतोस.' झुंजार पुटपुटला.

त्याच्या तीक्ष्ण कानांनीं पावलांचा आवाज ऐकला होता. एका क्षणानंतर रामलालचा चिंतायुक्त चेहरा मोटारीच्या उघड्या खिडकींत दिसला. आंत बसलेल्याची तपासणी करण्यासाठीं त्यानें आपलें डोकें आंत खुपसलें.

'झुंजार, तूं एकटाच आहेस ना ?'

'भाऊ, तूं जरी चष्मा लावला नसलास तरी तुला तें दिसतच आहे.' झुंजार म्हणाला.

रामलालनें रस्ता आणि आजूबाजू न्याहाळल्या. नंतर तो दार उघडून झुंजारच्या शेजारीं पण बैठकीच्या अगदीं टोंकावर बसला. तो घाबरलेला– अस्वस्थ झालेला दिसत होता.

'झुंजार, तुझ्या इच्छेप्रमाणें मी आलों आहें. पण मला गुप्तपणें भेटणें आवडत नाहीं.' तो म्हणाला, 'आपण दोघेच आहोंत, तेव्हां कसलाच व्यत्यय येणार नाहीं. पण तूं मला फार वेळ येथें बसविणार नाहींस अशी मला आशा वाटते.'

'तूं कुणालाहि न कळवितां घराबाहेर पडलास ना ?' झुंजारनें विचारलें.

'मी फिरावयास जातों असें बाबांना सांगितलें आणि पुढल्या दाराला आंतून कडी घालूं नकोस असें नोकराला सांगितलें.' तो म्हणाला, 'मी या-वेळीं अनेकदां फिरावयास बाहेर पडतों. पण मला फार वेळ बाहेर रहातां येणार नाहीं.'

'तुझे वडील कुठें आहेत ?' झुंजारनें विचारलें.

'बैठकीच्या खोलींत वाचीत आहेत.'

'आणि तुझी बहीण ?'

'ती झोंपली असावी असें वाटतें.' रामलाल म्हणाला, 'पण तूं मला तिच्याविषयीं बोलण्यासाठीं येथें आणलें नाहींस तुला महत्त्वाचें आणि खाजगी काय सांगावयाचें आहे ?'

'रामलालभाऊ, तूं तुझ्या दातांच्या कवळीशिवाय कसा दिसत असशील याचा मी विचार करीत होतों.' जोरानें सिगारेटचा झुरका घेत झुंजार म्हणाला, 'तुझें तोंड ढिलें आणि चमत्कारिक दिसत असेल नाहीं ?'

बाजूला बसलेला रामलाल एकदम ताठ बनला, 'काय म्हणालास ? मी कवळीशिवाय कसा दिसतों ? झुंजार, तुझा हा प्रश्न कमालीचा उद्धटपणाचा आहे आणि मला तो आवडला नाहीं.'

'तुला तो आवडणार नाहींच.' झुंजार शांतपणें म्हणाला, 'आतां माझा दुसरा प्रश्न तुला कितपत आवडतो तें पाहूं. तूं कॉंटॅक्ट लेन्सेस विकत घेतल्या-पासून त्यांचा किती वेळां उपयोग केलास ?'

रामलाल जोरानें श्वासोच्छ्वास करीत होता. मी कॉंटॅक्ट लेन्सीस् वापरीत नाहीं.' तो रागानेंच म्हणाला, 'झुंजार, तूं मला असले मूर्खपणाचे प्रश्न विचारतोस ! तुझें डोकें फिरलें आहे काय ?'

'ठीक आहे. आतां शहाणपणाचा प्रश्न विचारतों.' झुंजार म्हणाला, 'तूं मंजुळेचा खून कां केलास ?'

रामलालच्या तोंडून चमत्कारिक आवाज निघाला आणि त्यानें दाराची मूठ घट्ट पकडली. तो इतका अस्वस्थ झाला होता कीं त्याच्या नाकावरील मोठा चष्मा नाकावरून खालीं घसरणार होता. तो आतां इतक्या जोरानें श्वासोच्छ्वास करीत होता कीं तो धांपा टाकीत असावा असें वाटत होतें.

'तूं असल्या कामासाठीं आला आहेस असें मला वाटतच होतें.' तो करड्या आवाजांत म्हणाला, 'बाबांनीं मला तशी सूचना दिलीच होती. असले आरोप करण्याची तुला हिंमत तरी कशी होते ?'

'हा आरोप आहे काय ?' झुंजार म्हणाला, 'मीं तुला फक्त प्रश्न विचारला. थांब भाऊ, तुला इतक्यातच खालीं उतरतां येणार नाहीं. आपणांला खूप बोलायचें आहे. आपण दोघेच आहोंत. आपलें संभाषण कुणी ऐकणार नाहीं.'

'तुला विश्वासांत घेण्याची बाबांनीं किती घोडचूक केली ! नंतर त्यांच्या तें लक्षांत आलें.' रामलाल खेदानें म्हणाला, 'बाबा देत असलेले एक लक्ष रुपये नाकारण्यांत तूं खूप चातुर्य दाखविलेंस. तुला त्याहून अधिक रक्कम हवी होती ना ?'

'ही तुझी सूचना वाईट नाहीं, पण आपण मुद्द्यापासून दूर वहावत आहोंत.' झुंजार म्हणाला, 'मला एक लक्ष रुपयांची लालूच दाखविण्यांत आली हें त्या मूर्ख म्हाताऱ्यानें तुला सांगितलें तर ? कीं तूं आडून ऐकत होतास ? माझ्या मागोमागच तूं मोटारीनें मुंबईस गेलास, पण तूं कोणत्या कामासाठीं जात आहेस हें तुझ्या वडिलांना सांगितलें नसशील ?'

'मी घराबाहेर पडलोंच नव्हतों.' रामलाल म्हणाला, 'माझें मुंबइत कांहींच काम नव्हतें झुंजार, तूं कांहीच सिद्ध करूं शकणार नाहींस.'

'तो तुझा भ्रम आहे. तूं मूर्खांच्या नंदनवनांत रहात आहेस. पण त्याबद्दल तुला पश्चात्ताप होणार आहे.' झुंजार म्हणाला, 'मी तुला मंजुळेच्या खुनाची माहिती सांगूं काय ? माझ्या कदाचित् एक–दोन क्षुल्लक चुका होतील, पण माझें बोलणें संपलें कीं, तूं व्यवहाराबाबत बोलावयास तयार होशील.'

'मला वाटलेंच होतें !' रामलाल खुनशी स्वरांत म्हणाला, 'तुला पिळवणूक करायची आहे. तूं बदमाष आहेस हें मला माहीतच होतें ! सकाळीं मी तुझ्या संभावित वागणूकीनें फसलों होतों. तूं महापाजी माणूस

आहेस हें बाबांचें मत चुकीचें असावें असें मला वाटलें होतें–'

'हे तुझे शब्द कठोर आहेत, पण केवळ शब्दांनीं कुणाला दुखापत होत नाहीं.' झुंजार म्हणाला, 'तुला ती मंजुळेच्या खुनाची हकीकत ऐकावयाची आहे ना? कुठें चूक झाली तर तिकडे दुर्लक्ष कर. बारा वर्षांपूर्वीं तूं आनंदी मोरेचा खून केलास हें तुझ्या वडिलांना माहीत होतें...'

'साफ खोटें!' रामलाल म्हणाला.

'तुझ्या वडिलांना तें कसें समजलें त्याला महत्त्व नाहीं, पण तुला वांचविण्यासाठीं कोणत्याहि थराला जाण्याची त्यांची तयारी होती. तुझें सुदैव जोरावर होतें. त्या भागांत स्फोटामुळें अनेक आगी लागल्या होत्या आणि इमारतींची पडझड झाली होती. आणि रघुवीर त्याचवेळीं तिच्या समाचारासाठीं आला होता. प्रेत पाहून तो अननुभवी तरुण घाबरला. ती जिवंत आहे कीं काय हें पहाण्यासाठीं त्यानें तिला उचललें. त्यामुळें त्याच्या हातांना व कपड्यांना रक्त लागलें व नंतर त्याला अटक झाली.'

'हा केवळ तर्क आहे–' खांदे उडवीत रामलाल म्हणाला.

'मुळींच नाहीं. मी सत्य घटना सांगत आहें. त्यावेळीं तुझे वडील यशस्वितेच्या शिखरावर होते. त्यांना त्याचवेळीं इंग्रज सरकारनें दिवाण-बहादुर हा किताब दिला होता. त्यांनीं तुला वांचविण्यासाठीं निरपराधी रघुवीरचा बळी घेतला. त्यावेळची त्यांची वागणूक अत्यंत निर्दय व खुनशी-पणाची होती हें वर्तमानपत्रांनींहि प्रसिद्ध केलें आहे, पण त्यांनाहि धक्का बसला. रघुवीरला फांशावर न चढवितां वेड्यांच्या हॉस्पिटलांत पाठविण्यांत आलें. त्यांचें काम सोळा आणे साधलें नाहीं, पण तुला भीति उरली नव्हती.

'रघुवीर हॉस्पिटलांतून निसटला असें समजतांच तुम्हां दोघांनाहि धक्का बसला असणार. पण महिन्यांमागून महिने गेले तरी तो बेपत्ताच राहिला तेव्हां तुमची भीति नष्ट झाली असणार. कित्येक वर्षें लोटलीं. पोलिसांप्रमाणें, इतरांप्रमाणें रघुवीर मरण पावला असावा अशी तुमचीहि कल्पना झाली. तुम्ही शांतपणें भूतकाळ विसरून त्या गरुड–भरारींत आरा-मानें रहात होतां.

'नंतर अचानक बॉम्बचा स्फोट व्हावा : याप्रमाणें तुझ्या बहिणीनें लग्न केलें त्याच दिवशीं शरदनें स्वतः होऊन आपणच रघुवीर तिरंदाज आहोंत असें तुझ्या वडिलांना सांगितलें ! तुझे वडील हादरले. त्यांना खरा झटका आला नाहीं हेंच नवल. ते किती घाबरले असतील याची कल्पनाच करणें बरें.'

'माझे वडील घाबरले, पण माझ्या बहिणीचा एका खुनी माणसाबरोबर विवाह झाला म्हणून घाबरले.' रामलाल म्हणाला.

'त्यांच्या जुन्या पापाचें भूत अचानक समोर उभें राहिल्यामुळें ते घाबरले.' झुंजार ठांसून म्हणाला, 'त्यामुळें त्याला ठार करण्याची कल्पना त्यांना सुचली. त्यांनीं मला बोलाविलें आणि त्या कामासाठीं एक लक्ष रुपये देण्याची तयारी दर्शविली. त्यांनीं तुला ती गोष्ट सांगितली तेव्हां तूंहि घाबरलास, पण स्वतःच्या सुरक्षिततेसाठीं तूं निराळी योजना आंखलीस.

'त्यामुळेंच मी तुझ्या वडिलांची भेट घेऊन तेथून निघाल्यानंतर तूं माझ्या पाठोपाठच मुंबईस आलास. तुझी योजना तयार होती. अगदीं आनंदी मोरेप्रमाणेंच घडलेल्या गुन्ह्याबद्दल शरदला अटक करावयाची, त्याला ओळखणारी तरुणी ठार करावयाची व नंतर पोलिसांना ती माहिती द्याव-याची. तुझ्या वडिलांप्रमाणेंच तुलाहि आपल्या बहिणीची काडीचीहि पर्वा नव्हती. तूं फक्त स्वतःच्या कातडीचा विचार करीत होतास. म्हणूनच तूं मंजुळेची निवड केलीस.'

'मला हें भारूड ऐकावयाचें नाहीं.' रामलाल म्हणाला.

'माझें बोलणें संपेपर्यंत तुला थांबावेंच लागेल.' झुंजारनें त्याला बजाविलें, 'तुझ्या बहिणीच्या मुंबईच्या बिऱ्हाडांत मंजुळा एकटी असणार हें तुला माहीत होतें. ती तुला ओळखत होती. तुझ्यावर विश्वास ठेवणारी होती. लग्नाच्या दिवशींच बायकोपासून ताटातूट झाल्यामुळें शरद दुसरीकडे मन रमविण्याचा प्रयत्न करील हें कुणालाहि पटण्यासारखें होतें. बारा वर्षांपूर्वी अतिप्रसंगाला आनंदीनें नकार दिला म्हणून तिला ठार करण्यांत आलें असें चित्र तुझ्या वडिलांनींच रंगविलें होतें. मंजुळाचा खून त्याच कारणानें, त्याच पद्धतीनें व त्याच माणसानें केला असें तुला भासवायचें होतें.

'बिचाऱ्या मंजुळाला तुला दार उघडून आंत घेतांना मुळींच संशय आला नाहीं. विलासिनी पाठीमागून येत आहे असेंहि तूं तिला सांगितलें असशील. तूं तिला शरदला टेलिफोन करून विलासिनीला भेटण्यासाठीं बोलाविण्यास सांगितलेंस आणि तिनें रिसीव्हर खालीं ठेवला नाहीं तोंच पाठीमागून आनंदी-प्रमाणेंच तिचा गळा दाबलास.'

'नाहीं, नाहीं!' आपादमस्तक थरथरत रामलाल हळूच म्हणाला, 'हें खरें नाहीं!'

'तूं आनंदी मोरेच्या प्रकारची हुबेहूब नक्कल करण्यासाठीं तिचें हृदय बाहेर काढून त्याचे तुकडेहि केलेस. नंतर दार अर्धवट उघडें टाकून तूं तेथून बाहेर पडलास. आनंदीचें दारहि तूं असेंच अर्धवट उघडें टाकलें होतेस. तूं रक्तानें माखला होतास. पण तुझ्याजवळ ओव्हरकोट होता आणि तुझी मोटार बाहेर उभी होती. शरद तेथें यावयास निघाला होता, त्यामुळें त्याचें तें घर मोकळें असणार हें तुला माहीत होतें. तूं त्याच्या बाथरूममध्यें आपले हात व कपडे साफ केलेस व तेथें त्याच्याविरुद्ध पुरावा निर्माण करून ठेवलास.' झुंजार पुढें म्हणाला—

'येथपर्यंत ठीक होतें, पण नंतर मात्र तूं मूर्खासारखा वागलास. तूं तेथें असतांनाहि टेलिफोनची घंटा वाजली आणि ती तशीच वाजूं देण्याऐवजीं तूं रिसीव्हर उचललास! शेजाऱ्याचें त्या आवाजामुळें लक्ष जाईल अशी तुला भीति वाटली होती काय?'

'खोटें! साफ खोटें!' रामलाल कसेंबसें म्हणाला, 'मी येथें नव्हतोंच!'

'मीं टेलिफोन केला होता आणि माझा आवाज तूं लागलीच ओळख-लास.' झुंजार पुढें म्हणाला, 'कारण थोड्या वेळापूर्वींच तुझ्या घरांत तूं माझा आवाज ऐकला होतास. तुला काय बोलावें तें समजलें नाहीं. मी तेथें येतों असें म्हटलें त्याला तूं होकार दिलास. कदाचित् मला त्यांत गुंतवावें असेंहि तुला वाटलें असेल. तूं विलासिनीचा पत्ता माझ्यासाठीं लिहून ठेवलास व दार अर्धवट उघडें ठेवून तेथून बाहेर पडलास. ती तुझी निशाणी होती.

'त्यावेळीं आणखीं एक गोष्ट घडली. दारुड्या सुधाकराला शरद हाच रघुवीर आहे हें समजलें होतें. शरदनें आबासाहेबांना ती गोष्ट सांगितली तेव्हां सुधाकर त्याच बैठकीच्या खोलींत पडद्याआड लपला होता. त्यानें दारूच्या

तालांत ती गोष्ट आपल्या एका ओळखीच्या माणसाला सांगितली आणि योगायोगानें तो पंढरी तारकर आनंदी मोरेचा प्रियकर होता.

'तारकरहि तिरंदाजाचा द्वेष करीत होता. तो शरद या नांवानें चेंबूर येथें रहात आहे असें समजतांच तो सरळ तेथें गेला पण त्याचवेळीं तूं मोटारीनें तेथें आलास. दारावरील दिव्याच्या प्रकाशांत तारकरानें तुला स्पष्ट पाहिलें. त्याला तुझे हात व कपडे रक्तानें माखले आहेत हेंहि पहावयास मिळालें.'

'भलतेंच!' धांपा टाकीत रामलाल म्हणाला. झुंजारच्या तर्कानें तो भलताच हादरला होता. आपण काय बोलत आहों हेंहि त्याला समजलें नव्हतें. 'तूं तेथें नसणार, तेव्हां तुला तें समजणेंच शक्य नाहीं ... म्हणजे माझ्या बोलण्याचा अर्थ ...'

'तुझा किल्ला ढांसळूं लागला तर!' झुंजारनें शांतपणें विचारलें, 'पाजी बदमाषा, तूं लवकरच सर्व कांहीं कबूल करशील. तूं बाहेर पडेपर्यंत तारकर थांबला. नंतर तो तुझ्यासमोर उभा राहिला. वर्तमानपत्रांतील फोटोवरून त्यानें तुला ओळखलें. तो बदमाषच होता. त्यानें तुला लुबाडण्यासाठीं कसें मुठींत पकडलें हें महत्त्वाचें नाहीं. त्यावेळीं त्याला तूं मंजुळेचा खून केलास हें माहीत नव्हते. त्यानें तुला आज सकाळीं त्याच्या हॉटेलांत बोलाविलें. तुला तें कबूल करावें लागलें—आणि तूं हादरूनच घरीं परतलास.

'तूं बाहेरून आलास हें आवाजावरून तुझ्या वडिलांनीं ओळखलें आणि त्यांना सर्व हकीकत सांगणें तुला भागच पडलें. ते भयंकर संतापले हें उघडच आहे. तुम्हां दोघांनाहि त्या रात्रीं झोंप लागली नसणार. तुझ्या वडिलांची योजना तूंच जमीनदोस्त केली होतीस. शरदबद्दलचें सत्य जगजाहीर होणार होतें पण तुला आणि स्वतःला वांचवायला हवेंच होतें.

'नंतर सकाळींच मी तेथें आलों आणि तुम्ही आणखीं हादरलांत. शरद पोलिसांना सांपडला नव्हता! मीं त्याला लपविलें आहे असा तुम्हां दोघांनाहि संशय आला. त्यामुळेंच तूं आणखीं डोकें चालविलेंस आणि पुन्हां माझ्यामागून मुंबईस आलास. तुला तारकराची भेट घेणें भाग होतें. तूं बरोबर पैसे नेले होतेस. तारकर त्याकडे पहात असतांनाच तूं त्याच्या पाठींत सुरा खुपसलास.

'नंतर तुला माझा बंदोबस्त करावयाचा होता. तूं मला टेलिफोन केलास आणि कांहीं गुप्त माहिती सांगण्याच्या बहाण्यानें मला झुंजार महालांतील एका रिकाम्या फ्लॅटमध्यें भेटलास. त्यावेळीं माझ्या खुनाची तुझी योजना यशस्वी झाली असती, पण माझ्या बायकोनें मला वांचविलें. पण तरीहि दुसऱ्यानें कुणी तुझ्या आवाजाची नक्कल करून मला फसविण्याचा प्रयत्न केला अशी माझी समजूत होती. मीं तुझ्या घरीं टेलिफोन केलास तेव्हां तूंच माझ्याबरोबर बोललास आणि खुनी वेगळाच असावा असे मला वाटले.

'त्यानंतर मी विचार करूं लागलों. मंजुळेचा खून सुधाकरानें केला नव्हता तर मग मंजुळेचा ज्याच्यावर विश्वास होता असा दुसरा माणूस कोण? अर्थात तूंच! नंतर तुझ्या आवाजाची नक्कल करून तुझे वडीलच माझ्याबरोबर टेलिफोनवरून बोलले हें माझ्या लक्षांत आलें. तुम्हां दोघांच्या आवाजांत विलक्षण साम्य आहे!

'तेव्हां तुम्ही दोघेहि या कारस्थानांत भाग घेत असणार. पण त्यांना धांवपळ करणें शक्य नव्हते तेव्हा ते खून तूंच केले होतेस! रामलाल, माझी हकीकत ही अशी आहे.'

रामलाल कांहीं क्षण गप्प बसला होता. त्यानें अचानक विचारलें, 'तुला एक लक्ष रुपये कमी वाटतात तर तुझी मागणी तरी काय आहे? आमची सांपत्तिक स्थिति समाधानकारक असली तरी आम्ही कोटयाधीश नाहीं. तुला आम्ही दोन लक्ष रुपये देऊं. तूं आम्हांला मुठींत पकडलें आहेस. मी कबूल करतों—'

'भाऊ रामलाल, खून तूं केलेस हें कबूल करतोस तर?' झुंजारनें मध्येंच विचारलें, 'तूं आतां तें बोललास, तेव्हां तुला तें पुढें नाकबूल करतां येणार नाहीं. तूं मला एक लक्ष रुपयांची लांच देण्यास तयार झालास हीच गोष्ट तूं गुन्हेगार आहेस हें सिद्ध करण्यास पुरेशी आहे.'

'या शब्दांना काय महत्त्व आहे?' अधिऱ्या स्वरांत रामलाल म्हणाला, 'आपण दोघेच या ठिकाणीं आहोंत. स्वार्थ साधण्याचा तुझा डाव उघडच आहे. मीं आनंदी मोरेचा, मंजुळेचा आणि त्या पाजी तारकरचा खून केला हें तुझ्याखेरीज इतर कुणालाहि माहीत नाहीं आणि तूं स्वतःकरतां माझा विश्वासघात करणार नाहींस. शिवाय पोलिसांचें समाधान करण्याइतका

तुझ्याजवळ पुरावाहि नाहीं. तेव्हां असें तोंड बंद करणेंच चांगलें.'

'पण रामलाल, त्याचें तोंड पैशानें बंद करावयाचें नाहीं.' कुणीतरी कठोर आवाजांत म्हणालें आणि झुंजारच्या बाजूचें दार जोरानें उघडलें गेलें. 'झुंजार, तुझे दोन्ही हात वर उचल, नाहीतर तुझें डोकेंच शिल्लक रहाणार नाहीं.'

मोटारीबाहेर आबासाहेब गरूड उभे होते आणि त्यांनीं झुंजारवर पिस्तुल रोंखलें होतें !

## १६ : जय झुंजार !

अनपेक्षितच प्रकार होता ! तसें कांहीं घडेल अशी झुंजारची कल्पना नव्हती. झुंजारनें किंचित अयोग्य हालचाल केली तर आबासाहेब त्याला ठार करतील यांत शंकाच नव्हती. त्यानें निमूटपणें आपले हात वर उचलले.

'आबासाहेब, आम्ही दोघे बोलण्यांत इतके गढलों होतों कीं तुम्ही कधीं जवळ आलांत तें समजलेंच नाहीं.' तो शांतपणें म्हणाला.

'मी जवळ आलों आणि सर्व कांहीं ऐकलें.' आबासाहेब कठोर स्वरांत म्हणाले, 'माझी दृष्टि अधु आहे अशी स्वतःची फसवणूक करूं नकोस. मीं वेगळा चष्मा चढविला म्हणजे आंधळा नाहीं.'

'पण आबासाहेब, मीं काय करावें असें तुमचें म्हणणें आहे ?'

'तूं हालचाल करूं नकोस !' त्यांनीं बजाविलें, 'रामलाल, तुझ्या गळयांत मफलर आहेच. झुंजारचे दोन्ही हात मागें ओढून व्यवस्थित बांध !'

रामलालहि झुंजारप्रमाणेंच दचकला होता पण त्यानें कौशल्यानें झुंजारचे हात व्यवस्थित बांधले पण तसें करतांना त्याचे हात थरथरत होते. त्यानें चोवीस तास टिकाव धरला होता पण आतां तो गळून गेला होता व तें स्वाभाविक होतें.

‘ रामलाल, तूं बाहेर पडलास तेव्हांच मला संशय आला होता म्हणून मीं तुझा पाठलाग केला.’ आबासाहेब म्हणाले, ‘ पण तूं किती मूर्ख काहेस ! तुला तुझें तोंड बंदहि ठेवता आलें नाहीं.’

‘ पण बाबा, त्याला सर्व माहीत आहे !’ रामलाल म्हणाला, ‘ जणूं काय प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें त्यानें काय घडलें तें सर्व बरोबर सांगितलें !’

‘ झुंजार, तूं महाधूर्त आहेस आणि तुला यांत ओढलें हा माझाच दोष आहे.’ आबासाहेब म्हणाले, ‘ माणूस अडचणींत–विवंचनेंत असला तर त्याच्या हातून मूर्खपणा घडतोच, पण मी चूक दुरुस्तहि करूं शकतों.’

‘ आबासाहेब, शरदप्रमाणें माझा कायमचा कांटा काढण्याचा तुमचा विचार असला तर तसें करणें फार धोक्याचें आहे.’ झुंजार म्हणाला, ‘ त्यापेक्षां पराभव कबूल करणें जास्त चांगलें नाहीं काय ?’

‘ बाबा, तो केवळ पैशांच्या मागें आहे.’ रामलाल म्हणाला.

‘ आधीं तो एकटाच आला आहे अशी खात्री केली पाहिजे.’ आपल्या मुलाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून आबासाहेब म्हणाले, ‘ झुंजार, मी मूर्ख नाहीं. या आमच्या मोटारीमागें सामान ठेवण्याची जागा मोठी आहे. तुझी बायको जरी दिसण्यांत लहान आणि नाजुक असली तरी तीहि तुझ्याइतकीच घातकी आहे हेंहि मला माहीत आहे.’

झुंजार हंसला, ‘ ती सामान ठेवण्याच्या जागेंत लपली असावी असें तुम्हांला वाटते कीं काय ?’ त्यानें विचारलें.

पण आबासाहेबांनीं रामलालला पाठीमागच्या जागेचें झांकण उघडण्यास सांगितलें आणि आंत कुणी नाहीं अशी खात्री केली. नंतर त्यांनीं मोटारींत कुठें टेप–रेकॉर्डिंगचें मशीन दडविलें असल्यास तें शोधण्यास सांगितलें.

‘ नाहीं, तसलें मशीन कुठेंच नाहीं.’ रामलाल तपासणी करून म्हणाला, ‘ बाबा, तुम्हांला वेड लागलें आहे !’

‘ आपण सावधगिरी बाळगायला हवी. जर तुला बोलण्यांत फसविण्याचा त्याचा डाव असता तर तसलें मशीन त्यानें कुठेंतरी दडविलें असतें.’ आबासाहेब म्हणाले, ‘ पण आतां आपणांला लुबाडण्याचाच त्याचा डाव होता हें सिद्ध झालें. झुंजार, एकटाच आलास हा तुझा केवढा मूर्खपणा !’

'आबासाहेब, आतां मलासुद्धां तसेंच वाटूं लागलें आहे.' झुंजार मनः-पूर्वक म्हणाला.

'तूं आतां माझ्या हातांत बरोबर सांपडला आहेस.' आबासाहेब पुढें म्हणाले, 'तूं एकटा आल्यामुळें तुझा परिणामकारक बदोबस्त करणें सोपें जाणार आहे. माझ्या मुलाचें आयुष्य, माझा लौकिक आणि मला जें कांहीं प्रिय आहे तें धोक्यांत आहे हें तूं कबूल करशील आणि अशा निर्वाणीच्या वेळीं मी घुटमळणारा नाहीं. झुंजार, मोटारींतून खालीं उतर !'

'तुम्ही मला बाहेर काढून नंतर गोळी झाडणार तर ?' झुंजार म्हणाला, 'आबासाहेब, आपण खरोखरच विचारी आहांत. मोटार खराब झाली असती तर माझ्या बायकोला राग आला असता. पण तुम्हांला आवाजाची भीति वाटत नाहीं काय ? असल्या शांत वेळीं या तुमच्या पिस्तुलाचा आवाज दूरवर ऐकूं जाईल.'

'अगदीं शेवटपर्यंत तूं चेष्टाच करणार. पण झुंजार, या बोलण्याचा तुला कांहींच उपयोग होणार नाहीं. तूं खालीं उतर. जर पळण्याचा प्रयत्न केलास तर मी बेलाशक गोळी झाडीन.'

दोन्ही हात पाठीमागें बांधलेले असल्यामुळें झुंजारला फार जपून मोटारीं-तून बाहेर पडावें लागलें पण त्यानें गडबड केली नाही. आतां कोणत्याहि क्षणीं आबासाहेब पिस्तुल झाडतील असें त्याला वाटत होतें.

'रामलाल, तूं त्याच्या शेजारीं रहा पण मध्यें बरेंच अंतर सोड. कदा-चित मला त्याच्यावर पिस्तुलहि झाडावें लागेल.' आबासाहेब म्हणाले, 'झुंजार, मी तुझें काय करणार आहें तें सांगतों. येथून थोडयाच अंतरावर एक जुनी विहीर आहे आणि ती फार खोल आहे. मी तुला त्या विहिरींत फेंकणार आहें.'

'विहिरींत लोटलें म्हणजे रक्त नको किंवा दुसरा हिडीस प्रकार नको.' झुंजार म्हणाला, 'साधी पण परिणामकारक युक्ति. आबासाहेब, खरोखरच तुमचें डोकें अजब आहे.'

'या तुझ्या बोलण्यामुळें मी माझ्या निश्चयापासून परावृत्त होणार नाहीं.' आबासाहेब म्हणाले, 'चल चालूं लाग. थोडया अंतरावर तुला एक लोखंडी

फाटक लागेल. तें उघडलेस कीं थोड्याच अंतरावर ती विहीर आहे आणि तिला कांठहि नाहीं. आतां चालूं लाग!'

झुंजार पुढें पाऊलें टाकूं लागला तेव्हां त्याच्या कपाळावरून घामाच्या धारा वहात होत्या आणि मृत्यु त्याच्या पाठीमागून चालत होता!

थोड्याच वेळांत तें लोखंडी फाटक लागलें. रामलालनें तें उघडलें पण तो धांपा टाकीत म्हणाला, 'बाबा, तुम्ही मन:पूर्वक बोलत आहां काय? त्याला त्या विहिरींत टाकणें धोक्याचें नाहीं काय?'

'मला त्याचा लौकिक माहीत आहे.' स्थिर स्वरांत आबासाहेब म्हणाले, 'तो लुच्चा आहे, पण मी त्याला निसटण्याची संधि देणार नाहीं. एकदां ती विहीर बंद करावी असें माझ्या मनांत आलें होतें. पण मीं तसें केलें नाहीं याचा मला आनंद होता. त्या विहिरींत झुंजार कायमचा अदृश्य होणार आहे.'

'पण समजा, मीं विहिरींत उडी घेण्याचें नाकारलें तर?' झुंजारनें विचारलें.

'तर माझें पिस्तुल आहेच.' आबासाहेब म्हणाले.

'पण पिस्तुलाचा फार मोठा आवाज होईल.' झुंजारनें आठवण दिली.

'आवाजाची मला पर्वा नाहीं!' आबासाहेब म्हणाले, 'तूं मेलास कीं आम्ही तुला लागलीच विहिरीत फेंकणार. पण कुणीं आवाज ऐकलाच तर मी त्याचें समाधान करूं शकेन.'

'तरीसुद्धां एक अडचण आहेच.' झुंजार म्हणाला, 'माझी मोटार या रस्त्यावर तुमच्या बंगल्याजवळ काय करीत आहे याची चौकशी होईलच.'

'तुला ती भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. एकदां तुझा निकाल लागला कीं माझा मुलगा ती मुंबईस नेऊन झुंजारमहालाच्या आसपास उभी करील. तुझें काय झालें तें कुणालाच समजणार नाहीं.'

आतां ती विहीर दिसूं लागली होती. परिस्थिति चमत्कारिक होती पण आपण मरणार नाहीं. शेवटीं आपलाच जय होणार अशी झुंजारची खात्री होती. तो आतां विहिरीपासून अवघ्या सात-आठ फुटांवर होता.

आणि पिस्तुलाचा लहानसा आवाज झाला. आबासाहेबांच्या डाव्या

मांडीला वेदना होऊन ते विव्हळले. झुंजारनें हाताला बांधलेला मफलर केव्हांच सोडला होता. त्यानें मागें उडी घेऊन आबासाहेबांच्या पिस्तुलाचा हात पकडला पण तरीसुद्धां त्या चिवट म्हाताऱ्यानें चाप दाबला आणि कान-ठळ्या बसविणारा आवाज झाला.

पाठीमागच्या अंधारांतून धांवण्याचा आवाज झाला, 'तुम्हांला जखम तर झाली नाहीं ?' धांवत येणाऱ्या विजयेनें विचारलें.

'विजू, घाबरूं नकोस. फक्त आबासाहेबांच्या मांडीला जखम झाली आहे.' झुंजार म्हणाला. त्यानें आबासाहेबांचें पिस्तुल खिशांत घालून त्यांचे दोन्ही हात पकडले होते, 'तूं इतकी उत्कृष्ट निशाणबाज असशील अशी मला कल्पना नव्हती.'

'आम्हांला कांहीं करतांच यईना .' ती धांपा टाकीत म्हणाली, 'त्यांनीं पिस्तुल तुमच्या मानेलाच टेंकलें होते. शेवटीं मीं एकदांचा धीर केला.'

आणखीं धांपांचा आणि शिव्या–शापांचा आवाज ऐकूं आला. झुंजारनें मागें पाहिलें. संधि साधून पळत सुटलेल्या रामलालला आनंदरावांनीं खालीं पाडलें होतें.

'आतां तूं गडबड करूं नकोस.' आनंदराव त्याला म्हणाले, 'रामलाल गरुड, मी तुला मंजुळेच्या खुनाबद्दल अटक करीत आहें !'

'झुंजार, मदत जवळ आहे हें तुला माहीत होतें तर !' आबासाहेब म्हणाले.

'साहेब, याबद्दल मला वाईल वाटतें.' आनंदराव घसा खांकरीत म्हणाले, 'तुम्हांलाहि अटक करण्यांत येत आहे हें सांगायला नकोच.'

'खुनी माणसाचा साथीदार म्हणून—' आबासाहेब म्हणाले, 'तुम्ही पोलीस अधिकारी दिसतां. तुम्हांला तुमचे कर्तव्य केलेंच पाहिजे.'

'आबासाहेब, माफ करा. यांची ओळख करून देण्याचें गडबडींत राहू-नच गेलें.' झुंजार म्हणाला, 'हे सी. आय्. डी. सुपरिंटेंडेंट आनंदराव. रामलालभाऊ, हे फार संशयी आहेत. प्रत्यक्ष कानांनीं ऐकेपर्यंत हें तुला गुन्हेगार मानावयास तयार नव्हते.'

'पण तें ऐकणार कसे ?' भानावर येऊन रामलालनें विचारलें, 'आपण

दोघेच होतों. तूं मोटारींत टेप-रेकॉर्डर लपविला असशील अशी बाबांची मूर्खपणाची कल्पना होती–'

'ती कल्पना मूर्खपणाची नव्हती. तूं त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करायला हवेंस.' झुंजार म्हणाला, 'आबासाहेब, तुमचाच तर्क बरोबर होता. रामलालचें सर्व बोलणें रेकॉर्ड करण्यांत आलें आहे आणि तें खटल्याच्या वेळीं पुराव्यांत दाखल केलें जाईल.'

'रामलाल, शेवटीं तूं मूर्खच ठरलास.' आबासाहेब खेदानें म्हणाले, 'पण मोटारींत यंत्र नाहीं असें तूं मला सांगितलेंस.'

'आबासाहेब, त्याचें म्हणणें बरोबर होतें. मोटारींत तें यंत्र नव्हतेंच.' झुंजार म्हणाला, 'तुम्ही कदाचित् मोटारीची तपासणी कराल म्हणून तें मोटारीच्या बॅटरीला लांब तार जोडून पन्नास यार्डांवर ठेवलें होतें व तेथेंच आनंदराव व विजू हीं दोघें होतीं.'

'साहेब, आतां तुम्हांला माझ्याबरोबर आलें पाहिजे.' आनंदराव अस्वस्थ होऊन आबासाहेबांकडे पहात म्हणाले, 'आपण गडबड करणार नाहीं अशी मला आशा वाटते.'

'आतां मी कसली गडबड करणार !' आबासाहेब म्हणाले.

पण त्यांनीं एका झटक्यासरशीं झुंजारच्या पकडींतून आपला हात सोडविला. ते लंगडत पुढें धांवले आणि त्यांनीं त्या विहिरींत उडी घेतली.

'अरे देवा !' आनंदराव म्हणाले, 'हें त्यांनीं कां करावें ?'

'मला वाटतें, त्यांनीं योग्य तेंच केलें.' झुंजार म्हणाला, 'रामलालवर त्यांचें अतिशय प्रेम होतें. त्यांचें सर्व जगच कोसळून पडलें होतें. ते फार अभिमानी आणि शूर होते, पण त्यांना पुढलें भवितव्य आवडणारें नव्हतें.'

'पण आपणांला कांहीं करतां येणार नाहीं काय ?' आनंदराव म्हणाले.

'तुम्हीं त्यांना बाहेर काढूं शकणार नाहीं.' रामलाल म्हणाला, 'ती फार खोल विहीर आहे आणि आंत गॅस आहे. ते केव्हांच मरण पावले असणार.'

'अरे देवा !' आनंदराव म्हणाले आणि त्यांनीं रामलालच्या हातांत बेडया अडकविल्या. 'नीच, खुनी माणसा !' ते पुढें म्हणाले, 'तूंच आनंदी

मोरेचा खून केलास हें झुंजारचेंच म्हणणें बरोबर होतें. तें प्रकरण गेलीं बारा वर्षें माझ्या मनाला डांचत होतें. रघुवीरनें तो खून केला असें मला कधींच वाटलें नव्हतें पण तुला वेडयाचें सोंग घेऊन फांस चुकवितां येणार नाहीं आणि ज्या दिवशीं तूं फांसावर चढशील त्या दिवशीं मला अत्यानंद होईल.'

आनंदरावांनीं टेप-रेकॉर्डर ताब्यांत घेतला व रामलालला स्थानिक पोलिसांच्या मदतीनें जवळच्या पोलीस ठाण्यावर हलविलें.

झुंजार आणि विजया मोटारीनें मुंबईकडे निघालीं होतीं.

'विजू, हें प्रकरण फार वाईट होतें.' मोटार चालवितांना झुंजार म्हणाला, 'अजून आपलें थोडें वाईट कार्य शिल्लक आहे.

'होय. आपण मुंबई सोडण्यापूर्वीं मीं तिला टेलिफोन करून झुंजार महालांत येण्यास व आपली वाट पहाण्यास सांगितलें याचा आतां मला आनंद होतो.' तो म्हणाला, 'ती बातमी सांगतांना शरद जवळ असला तर तिला विशेष धक्का बसणार नाहीं. ठीक झालें कीं रामलाल हा तिचा सावत्र भाऊ आहे–'

'मला तें माहीत नव्हतें.' विजया आश्चर्यानें म्हणाली.

'होय, रामलाल हा आबासाहेबांच्या पहिल्या बायकोचा मुलगा.' तो म्हणाला, 'नंतर त्यांचें विलासिनीच्या आईबरोबर लग्न झालें, पण अगदीं सुरुवातीपासूनच त्यांचें आपल्या मुलीवर प्रेम नव्हतें. ती जवळ असावी असें त्यांना कधींच वाटलें नव्हतें.'

'पण तिला रामलाल आवडत नव्हता ?' विजयेनें विचारलें.

'नाहीं तिचा त्याच्यावर मुळींच विश्वास नव्हता हें तिनेंच मला टेलिफोनवरून सांगितलें होतें. तो आबासाहेबांचा लाडका होता, त्यामुळें तो लहानपणापासूनच तिचा नावडता होता. तिला विशेष दुःख होईल असें मला वाटत नाहीं.'

'बारा वर्षें आबासाहेबांनीं तें भयंकर रहस्य हृदयाशीं बाळगिलें होतें. विजया म्हणाली, 'आपला मुलगा निर्दय खुनी आहे हें माहीत असतांना त्यांनीं एका निरपराधी माणसाला फांसावर चढविण्याचा प्रयत्न केला! केवळ सुदैवामुळें शरदची वेडयाच्या हॉस्पिटलांत रवानगी करण्यांत आली. ते मेले याचा मला आनंदच होतो!'

' आनंदरावांनी तेथें यावें यासाठीं मला त्यांची खूपच मनधरणी करावी लागली.' झुंजार हंसून म्हणाला, ' त्यांना वाटलें कीं मला वेड लागलें आहे. आतां अर्थातच ते सर्व श्रेय लाटतील. पण त्याबद्दल मला वाईट वाटत नाहीं. या प्रकरणांत मला माझें नेहमींचें कमिशन मिळालें नाहीं याचाहि मला खेद होत नाहीं. विजू, मला आनंद होतो कीं शेवटीं तुझ्या झुंजारचाच जय झाला ! जय झुंजार !'

विजया त्याला प्रेमानें बिलगली आणि आनंदानें म्हणाली, ' जय झुंजार !'

— समाप्त —

(पुढील पानावर पहा—)